Books on Peace and Spirituality by
**Maulana Wahiduddin Khan**

The purpose of this book is to re-engineer the mind of those who think in terms of voilence. The book has a twofold target : first to help those how are engaged in voilence realize that the present age is an age of peace. Second, the author expounds on the guiding principles that should govern the actions of those who want to establish peace in society.
Pages : 192







Islam has become synonymous with global political jihad today and islamic spirituality is often mistaken for orthodoxy. Then how do young Muslims hold on to their faith? How do they open the door for others to appreciate the true beauty of their religion ?
Pages : 222

Lucidly written and expensive in scope, this work clears up the misunderstandings that abound on the subject of islamic teachings about peace and war. It clearly states the authentic position on these mattes, which is that islam is a completely peaceful religion.
Pages : 352



# प्रास्ताविक

सृष्टीतील सर्वकाही-सूर्य, चंद्र, तारे-पूर्णतः निर्मात्याच्या नियंत्रणात आहेत. त्याने निर्धारित केलेल्या मार्गापासून ते किंचितदेखील दूर जाऊ शकत नाहीत. त्याचप्रमाणे निर्मात्याच्या नैसर्गिक नियमानुसारच सर्व मूलद्रव्ये कार्यरत असतात. अशाप्रकारे संपूर्ण सृष्टी निर्मात्यास समर्पित आहे.

परंतु माणसाचे स्थान आणि भौतिक जग यात साम्य नाही. भौतिक जगासाठी निर्मात्यास समर्पित जाणे याखेरीज दुसरा कोणताही पर्याय नाही. माणसास मात्र स्वेच्छा प्रदान करण्यात आली आहे. त्यानुसार तो चांगल्या अथवा वाईट मार्गाचा पर्याय निवडतो. त्यासाठी विचार करण्याचे सामर्थ्य त्याला बहाल करण्यात आले आहे. त्याचप्रमाणे नैतिक मूल्यांवर निर्णय घेण्यासाठी सद्सद्विवेकबुद्धी देण्यात आली आहे. आयुष्यात काही तत्त्वांचा स्वीकार करणे, अथवा ते नाकारणे यासाठी तो समर्थ आहे. इतर सजिवांप्रमाणे काही निर्धारित नियमांशी तो बांधिल नाही. विचार, पर्याय आणि कृती यांचे त्यास स्वातंत्र्य आहे.

निवड करण्याच्या या स्वातंत्र्यातच माणसाची कसोटी आहे. विचार करण्याची शक्ति, सद्सद्विवेकबुद्धि आणि चांगले-वाईट यामध्ये निर्णय घेण्याचे सामर्थ्य हे माणसास देण्यात आले असले तरी निर्मात्याने त्यास अशा जगात सोडले नाही ज्यामध्ये त्यास सत्याचा मार्गच सापडणार नाही. त्याहून अधिक नैसर्गिक तरतूद त्याच्यासाठी उपलब्ध करून देण्यात आली आहे. निर्मात्याने मानवजातीस मार्गदर्शन कसे केले हे पाहण्यासाठी निर्मितीच्या प्रारंभाचा वेध घ्यावा लागेल. त्याने आदम या पहिल्या पुरुषास केवळ मर्त्य बनवले नाही, त्यांनी मार्गदर्शनापासून वंचित राहू नये म्हणून त्याना पैगंम्बरदेखील केले. तुमच्यापासून जे अपेक्षित आहे त्या सर्वांचे निर्मात्याने त्याना ज्ञान दिले. भरकटलेल्या अवस्थेत असलेल्या मानवास पुन्हा सदाचाराच्या मार्गाकडे आणावे यासाठी त्याने या जगांत मोठ्या संख्येने प्रेषित पाठवले. त्यामध्ये पैगंम्बर मुहम्मद अखेरचे!

# अल्लाहवर श्रद्धा

समजा साधारणत: २५ मैल वेग असलेल्या कुंभाराच्या चाकावर एखादा गोल दगड ठेवला आणि चाकास जोराची गती दिली तर तो दगड फेकला जाईल. आता क्षणभर विचार करा! आपण राहात असलेल्या पृथ्वीची गती कुंभाराच्या चाकाच्या गतीपेक्षा कितीतरी पटीने जास्त आहे. परंतु आम्ही फेकले जात नाही. पृथ्वी त्याच्या कक्षेत सतत ताशी १००० मैल वेगाने फिरत असते. प्रवासी विमानापेक्षा पृथ्वीचा वेग जास्त आहे. तरीदेखील पृथ्वीच्या पृष्ठभागावर आम्ही वावरत असतो आणि कुंभाराच्या चाकावरून फेकल्या जाणाऱ्या दगडाप्रमाणे फेकले जाऊ अशी भीती न बाळगता दैनंदिन जीवन आम्ही जगत असतो. हा काय चमत्कार आहे? वैज्ञानिकांनी यासंदर्भात केलेला खुलासा असा आहे की, पृथ्वी आम्हाला वेगाने वर ओढत असते, तर वर असलेले वातावरण आम्हाला खाली दाबत असते. खालून वर खेचणारा दाब आणि वर सुमारे पाचशे मैल हवेचे आवरण हे चमत्कार आहेत. त्यामुळे आम्ही अवकाशात फेकले जात नाही. आम्ही राहात असलेल्या संपूर्ण जगाच्या आश्चर्यकारक निसर्गनियमांना हे अधिक बळकटी देणारे आहे.

वास्तविक पाहाता, जगातील प्रत्येक गोष्ट म्हणजे एक चमत्कार आहे. बि-बियाणे जमिनीत पेरल्यानंतर काय होते? यावर थोडा विचार करा. पेरणी करण्यात आलेली जमीन ही समरूप असते. त्यात विविध प्रकारच्या वनस्पतींची रास निर्माण होते. मुळा, गाजर, सलगम, पेरू, आंबा सर्व जातींच्या गवताच्या लवचिक पात्यांपासून प्रचंड ओक वृक्षापर्यंत सर्वकाही या जमीनीत निर्माण होते. प्रत्येक वनस्पतीचा एक विशिष्ट गुणधर्म, विशिष्ट चव आणि सुवास असतो आणि माणसाचा त्यापासून फायदा होतो.

आमच्या अवतीभवती सर्वत्र जगभर विविध आश्चर्यजनक गोष्टी पसरलेल्या आहेत. प्रत्येक क्षणी विभिन्न प्रजाती सातत्याने मोठ्या प्रमाणात अस्तित्वात येत असतात. असे असले तरी जगभरातील सर्व लोक एकत्रित आले तरी छोटासा वाळूचा कणदेखील ते तयार करू शकणार नाहीत. या सर्व गोष्टी आश्चर्यकारक आहेत, ज्या शब्दबद्ध करता येत नाहीत. ज्यावेळी आम्ही तसा प्रयत्न करतो, त्यावेळी आम्ही त्यांचे अवमूल्यन करतो. कारण

मानवी शब्दांनी आम्ही त्यास न्याय देऊ शकत नाही. त्याकडे पाहात राहाणे एवढेच आम्ही करू शकतो आणि उद्गारतो, "अल्लाहखेरीज असा चमत्कार कोण करू शकतो. ?"

## सर्वच आश्चर्यकारक

जगातील प्रत्येक गोष्ट अणूंनी बनलेली आहे. विघटिकरणाच्या अंतिम टप्प्यात सूक्ष्म अणूरेणूंनी प्रत्येक वस्तू बनल्याचे सिद्ध होते. परंतु ज्यावेळी काही प्रमाणात हेच अणू एकत्र येतात त्यावेळी आश्चर्यकारकरित्या त्या माध्यमातून प्रकाशमान सूर्यग्रह निर्माण होतो. मात्र ज्यावेळी तेच अणू वेगवेगळ्या प्रमाणात इतरत्र जमा होतात त्यावेळी ते धबधब्यातून प्रवाहित होतात, त्यांचे हवेत रूपांतर होते, अथवा सुपीक जमिनीत एकाच प्रकारच्या अणूंपासून सर्व गोष्टी बनल्या असल्या तरी, प्रमाण आणि प्रकार या बाबतीत प्रत्येकाचे स्वरूप कमालीचे भिन्न असते. या अद्भुत जगाद्वारे मानवासाठी सातत्याने साधनसामग्रीचा पुरवठा होत असतो. ह्याचा तो सदुपयोग करत असतो. त्याच्या आयुष्यात त्याच्या गरजांसाठी साधनसामुग्रीचा अमर्याद पुरवठा जमा होतो, ज्याचा उपभोग घेण्यासाठी माणसास फारच कमी कष्ट घ्यावे लागतात. उदाहरणार्थ, त्याचा आहार! त्याच्यासाठी सृष्टीच्या नियमानुसार पौष्टिक आहार मोठ्या प्रमाणात उपलब्ध होत असतो. माणसास केवळ त्याचे हात लांब करावे लागतात. ज्यावेळी ते त्याच्या ताब्यात येते त्यावेळी ते पोटात पोहचेपर्यंत हात आणि जबडा हालवणे एवढेच काम त्याला करावे लागते. त्यानंतर अधिक प्रयासाविना अन्नाचे त्याच्या शरीराद्वारे पोषण होते आणि मांस, रक्त, हाडे, नखें, केस आणि मानवी शरीराच्या इतर अवयवांत त्याचे रूपांतर होते. अन्न मनुष्याच्या शरीरास क्रियाशील बनवते. पेट्रोलियम हा आणखी एक पदार्थ त्याच्या प्रक्रिया सतत चालू ठेवत असतो. माणसास फक्त ते जमीनीतून काढावे लागते, त्याचे शुद्धिकरण करावे लागते आणि त्यानंतर ते यंत्रामध्ये टाकावे लागते. हे प्रवाही इंधन त्याचा गुणधर्म संथपणे पुढे चालू ठेवते. अशा प्रकारचे अगणित पदार्थ या जगामध्ये निर्माण होतात आणि मानवाच्या गरजा पूर्ण करण्यासाठी त्या पुरेशा असतात. हे पदार्थ बाहेर काढणे अथवा त्यांना आकार देणे ही माणसाची भूमिका

भौतिकदृष्ट्या अत्यंत छोटी आहे आणि म्हणून कमीतकमी परिश्रमात माणसास त्याचे कपडे, निवास, फर्निचर, यंत्रसामग्री, वाहाने आणि या सर्वांसाठी लागणारे सुटे पार्टस् उपलब्ध होतात. पुन:पुन्हा निर्माण होणाऱ्या या गोष्टींमुळे हे सिद्ध होण्यासाठी पुरेसे नाही का, कि या जगाचा कोणीतरी निर्माता आहे?

पृथ्वी सतत दोन प्रकारे फिरत असते. एक स्वत: भोवती आणि दुसरे सूर्याभोवती! या प्रक्रियेत कोणताही आवाज नाही. एखाद्या मोठ्या कारखान्याप्रमाणे झाड कार्य करीत असते. परंतु कोणताही धूर सोडत नाही. समुद्रामध्ये अगणित जीव मृत्युमुखी पडतात. परंतु त्यांच्यामुळे जलप्रदूषण होत नाही. अब्जावधी वर्षांपासून नैसर्गिक आज्ञेनुसार जीवसृष्टी चालली आहे, ज्यापद्धतीने तिचे नियोजन करण्यात आले आहे ते परिपूर्ण आहे. आकाशत फिरणारे असंख्य तारे आणि उपग्रह यांची गती एकच असते. ते एकदुसऱ्यांच्या मागे पडत नाहीत आणि मर्यादाभंगदेखील करत नाहीत. या सर्व उच्च कोटीतल्या अद्भुत गोष्टी आहेत. मानवाने निर्माण केलेल्या वस्तूंपासून हे सर्व खूप आश्चर्यकारक आहे. या जगावर महान अल्लाहच्या सामर्थ्यांचा प्रभाव आहे हे जाणून घेण्यासाठी आणखी कोणता पुरावा आम्हाला हवा आहे?

## निर्मात्याचे संकेत

ज्यावेळी विविध जीवरचना आम्ही बघतो, त्यावेळी एक आश्चर्यकारक दृष्य आम्हाला पाहावयास मिळते. काही भौतिक पदार्थ एकत्रितपणे एकाच शरीरात प्रवेश करतात आणि त्यापासून पाण्यात पोहणारा मासा अथवा आकाशात तरंगणारा पक्षी अस्तित्वात येतो. पृथ्वीवरील जैवविविधतेत मानव सर्वाधिक मनोरंजक आहे. अनेक बाबतीत तो रहस्यमय आहे. तो उत्कृष्ट आकारात घडवण्यात आला आहे. त्याच्यातील हाडे शरीराच्या सांगाड्यात योग्य आकार घेतात. मांसाने ते आच्छादित करण्यात येतात आणि त्वचेने बंद करण्यात येतात. त्यामधून केस आणि नखें निर्माण होतात. या प्रतिकृतीतून रक्तप्रवाह सुरू होतो आणि प्राणीमनुष्य साकारला जातो. तो चालू लागतो. आपल्या हाताने वस्तू पकडतो, ऐकतो, वास घेतो, चव घेतो. त्याला मन

असते. त्यामध्ये तो माहिती संकलित करतो, विश्लेषण करतो आणि त्यानंतर आपल्या संभाषणात आणि लेखनांत प्रकट करतो. द्रव पदार्थांमधून साकारलेला हा सजीव प्राणी म्हणजे एक आश्चर्य आहे. ज्या अणूंनी मनुष्य घडवला जातो तेच अणू जमीनीत आणि दगडात असतात. परंतु जमिनीचा एखादा तुकडा अथवा दगडाचा एखादा तुकडा बोलताना आपण कधी पाहिले आहे का? माणसाचे सामर्थ्य वर्णन करण्यासाठी चमत्कार हा शब्द थिटा पडतो. याहून महत्वाचे म्हणजे चालणारा, बोलणारा, विचार करणारा, संवेदनशील माणूस हा जमीन आणि दगडाहून भिन्न नाही का? याचे हे कारण आपल्यासाठी अद्याप गूढ आहे. त्यामुळे असे गुणवैशिष्ट्य असलेल्या पदार्थांच्या संयोगाच्या माध्यमातून निर्मीतीचे एक अद्वितीय महत्कृत्य करणारा निर्माता महान आहे.

निर्मात्याचे आकलन व्हावे यासाठी माणसाने स्वत:बद्दलच विचार करावयास हवा. माणसातील स्वत्व आणि मीपण म्हणजेच त्याचे व्यक्तिमत्व! जगामध्ये राहाणाऱ्या त्याच्या जातीतील सर्वांपेक्षा ते भिन्न असते. माणसाचे मीपण निश्चितच त्याचे स्वत:चे अस्तित्व असते. माणसाचा हा अविभाज्य घटक आहे. तो विचार करतो, आपले स्वत:चे मत बनवतो. त्याचे काही हेतू असतात जे तो व्यवहारात प्रकट करतो. काय कृती करावी याचा तो स्वत:च निर्णय घेतो. स्वत:ची इच्छाशक्ति आणि सामर्थ्य आहे असे प्रत्येक मनुष्याचे वेगळे व्यक्तिमत्व असते. अशा प्रकारच्या अस्तित्वाचा आपणास दैनंदिन अनुभव येतो. असे असताना निर्मात्याचे अस्तित्व ज्याचा आपणावर मोठ्या प्रमाणावर प्रभाव असतो यात काय आश्चर्य आहे? निर्मात्यावर श्रद्धा ठेवणे हे स्वत:वर श्रद्धा ठेवण्याच्या बौद्धिक प्रक्रियेसमान आहे आणि म्हणून पवित्र कुरआनात म्हटले आहे, “मनुष्य स्वत:च स्वत:साठी साक्षीदार आहे. त्याने कितीही सबबी पुढे केल्या तरी!” (७५:१४:१५)

अल्लाहचे सत्य आणि त्याचा संदेश यावर श्रद्धा ठेवण्यापूर्वी काहीं अद्भुत पुरावा हवा अशी लोकांची मागणी आहे. मोठ्या प्रमाणात लाखों वर्षांपासून पूर्णपणे कार्यरत विशाल जीवसृष्टीत ते स्वत:च अद्भुत असतांना त्यांना आणखी काय पुरावा हवा? जर कोणी साशंक एक महान चमत्कार मान्य करण्यास तयार नसेल, तर ज्यावेळी तो कमी प्रभावशील चमत्कार

पाहील त्यावेळी आपल्या शंकांचे निरसन कसे करू शकणार? अल्लाहवर श्रद्धा ठेवण्यासाठी मानवास त्याच्या गरजेनुसार सर्वकाही नंतरच पुरवण्यात आले आहे. त्याला त्याच्या सेवेत रूजू करण्यात आले आहे. असे असले तरी अल्लाहवर तो श्रद्धा ठेवत नाही. त्याचे सामर्थ्य आणि त्याच्या प्राविण्याबाबत पोच देत नाही. त्यासाठी त्याच्याखेरीज दुसऱ्यास दोष देता येणार नाही.

## अखेर अल्लाहचा शोध

ज्यास अल्लाहचा शोध लागला त्यास सर्व प्राप्त झाले. अल्लाहचा शोध लागल्यानंतर कोणतेही संशोधन करण्याची गरज नाही. ज्यावेळी अल्लाहचा शोध लागतो, त्यावेळी माणसाचे सर्व लक्ष त्याच्यावरच केंद्रिंत होते. त्याच्यासाठी तो एक खजिना असतो. ज्यास तो कवटाळतो आणि आपल्या ऐहिक आणि चिरंतन गरजांसाठी त्याचाच आश्रय घेतो.

अल्लाहचे जग हे अणूंचा संग्रह आहे. मूलद्रव्याच्या रूपात त्यामध्ये तेच द्रव पदार्थ सामावलेले असतात. अल्लाहने मात्र विविध रूपांत ते परिवर्तित केले आहेत. प्रकाश, ऊर्जा, हिरवळ, वाहाते पाणी. इत्यादी. रंग, चव आणि वास हे गुणधर्म असलेले निर्जीव पदार्थ त्याने प्रभावित केले. प्रत्येक वस्तू गतिमान केली आणि गुरुत्वाकर्षणाच्या माध्यमातून ही गती नियंत्रित केली. अर्थात एखादी शुष्क प्रणाली (Dry Creed) अवगत करण्यापेक्षा अशा प्रकारच्या जगाची निर्मिती करणाऱ्या अल्लाहचा शोध घेणे अधिक योग्य ठरेल. याचा अर्थ देदिप्यमान प्रकाशाने आपले हृदय आणि आत्मा उज्ज्वल करणे आणि अविश्वसनीय सौंदर्य आणि जे रमणीय आहे त्यासाठी आपले मन खुले करणे.

ज्यावेळी आम्ही स्वादिष्ट फळे खातो, त्यावेळी आमच्या मनात आनंदाची भावना असते. ज्यावेळी आम्ही सुरेल संगीत ऐकतो, त्यावेळी आम्ही त्यात मंत्रमुग्ध होतो. ज्यावेळी एखाद्या जोडप्यास सुंदर मूल होते, त्यावेळी त्यांचा आनंद गगनांत मावत नाही. मग अल्लाहबद्दल आमचा काय अनुभव जो सर्व प्रकारचे सौंदर्य, आनंद आणि गुणकौशल्याचा उद्‌गाता आहे? त्याचा शोध लागल्यानंतर भाराऊन जाणार नाही असा कोण आहे? हे असे काही आहे जे कल्पनाशक्तीच्या पलिकडचे आहे. अशा प्रकारचा उदात्त

अनुभव देदिप्यमान प्रकाशाच्या समीप जाण्यासारखे आहे. याची खूणगाठ आमच्यावर कोरली जाते. अद्‌भुत गुणवत्ता असलेली सामग्री बहाल करण्यास अल्लाह शोधकार्याचा रक्षणकर्ता आहे. त्याचा शोध म्हणजे नाकपुड्यात दरवळणारा सुगंध, रसेंद्रियांना उद्दीपित करणारा स्वाद जो कोडकौतुकाचा आदंन देणारा आहे आणि मधुर नाद जो हृदयाला स्पर्श कारणारा आहे. त्याच्याजवळ येणे हे त्या बागेत चिरंतन राहाण्यासारखे आहे जी रंगानी उजळून निघालेली आहे. त्यामध्ये दरवळणार सुवास आहे आणि चिरकालीन संगीत ऐकण्याची अनुभूती आहे.

सर्व प्रकारच्या प्रकाशाचा तो निर्माता आहे. तो आकाश आणि पृथ्वीचा प्रकाश आहे. जे त्याचा शोध घेतात, ते या देदिप्यमान प्रकाशाने उजळून निघतात. सर्व ज्ञानांचा तो संग्रहालय आहे. सर्व प्रकारचे सामर्थ्य त्यात सामावलेले आहे. त्याचे शोधकर्ते त्याच्या सामर्थ्याने बंदिस्त आहेत आणि त्याच्या ज्ञानाने प्रभावित आहेत. कोणत्याही प्रकारचे तुफान अथवा जलप्रलय ते घेऊन जाऊ शकत नाही. त्याची ओळख झाल्यानंतर उच्च कोटीतील मानव उद्‌यास येतो.

## अल्लाहची निर्मिती योजना

या अद्‌भुत आणि अफाट विश्वामध्ये माणूस एक अद्‌भुत प्राणी आहे असे एका पाश्चिमात्य तत्त्ववेत्याने लिहिले आहे. असे वाटते की, जगाची माणसासाठी निर्मिती झालेली नाही, अथवा माणसाची जगासाठी निर्मिती झालेली नाही, दोन्ही असमान आहेत.

अमर्याद सामर्थ्यनिशी माणूस जन्माला आला. परंतु सद्याच्या जगात त्याचा फारच कमी उपयोग होतो. त्याच्या स्वभावानुसार शाश्वत राहण्याची मनुष्याची इच्छा असते. परंतु लवकरच मृत्यु येतो आणि त्याच्या जीवनाची अखेर होते. त्याच्या मनांमध्ये आशाआकांक्षांचा कल्लोळ असतो. परंतु या आकांक्षा कधीच पूर्ण होत नाहीत. त्याच्या मनात आशाआकांक्षांचे जीवन घर करून असते. परंतु या आशाआकांक्षा कधीच पूर्ण होत नसतात. यामध्ये गरीब माणूस किंवा श्रीमंत माणूस असा कोणताच भेद नसतो. सद्याचे जग आणि माणूस यांच्यात इतकी असमानता का आहे? अल्लाहच्या निर्मिती

योजनेमध्ये याचे उत्तर आम्हास मिळू शकते. प्रत्येक माणूस त्याच्या स्वप्नातील जग जोपासत असतो. मात्र ही स्वप्ने कधीच खरी होत नसतात. यामध्ये गरीब अथवा श्रीमंत, मोठा अथवा छोटा असा भेद नाही. वर नमूद करण्यात आलेल्या तत्त्ववेत्त्याच्या शब्दांनुसार असे वाटते की, माणूस अशा जगात अवतीर्ण झाला आहे जे जग त्याच्यासाठी निर्माण करण्यात आलेले नाही.

माणूस आणि सद्याचे जग एक दुसऱ्यांसाठी का पूरक नाहीत? या प्रश्नाचे उत्तर देण्यासाठी आम्ही अल्लाहची निर्मिती योजना लक्षात घेतली पाहिजे. अल्लाहची योजना लक्षात आली तरच आम्हास खात्रीलायक उत्तर मिळू शकते.

वास्तव असे आहे की, अल्लाह म्हणजेच मानवाच्या निर्मात्याने आपल्या योजनेनुसार माणसाची निर्मिती केली. ही योजना समजण्यासाठी माणसाने स्वत:स समजून घेणे आवश्यक आहे. एखादी मशीन कशी चालते हे तयार करण्यात आलेल्या इंजिनिअरच्या प्लॅनवरून आपणास समजते. इंजिनिअरखेरीज ते मशीन कशासाठी आहे याचा खुलासा करणारे दुसरे कोणतेही साधन नाही. माणसाचे असेच आहे. माणसाच्या निर्मात्याने त्याच्या खास योजनेनुसार त्याची निर्मिती केली आहे. या अपूर्व जगामध्ये माणसाने आपल्या कसोटीचा कालावधी व्यतीत करावा. त्यानंतर त्याने केलेल्या कृत्यानुसार शाश्वत जगात राहण्याचा हक्क त्याला मिळेल. याचेच दुसरे नांव आहे, स्वर्ग!

सद्याचे जग हे कसोटीचे जग आहे. कोणत्याही पुरूष अथवा स्त्रीला स्वर्गात प्रवेश करण्यासाठी आपली गुणवत्ता सिद्ध करावी लागेल. सत्याची ओळख आणि शिस्तबद्ध जीवन असलेले पुरूष अथवा स्त्रीया स्वर्गाच्या आदर्श जगासाठी पात्र असतील. जे या कसोटीत अनुत्तीर्ण होतील त्यांना त्यांचे जीवन शाश्वत विनाशात व्यतीत करावे लागेल.

## आम्हास पूर्ण स्वातंत्र्य आहे का?

या ऐहीक जगामध्ये आपणास पूर्ण स्वातंत्र्य आहे असे माणसास

वाटते. परंतु या स्वातंत्र्यावर त्याचा हक्क नाही. या उलट प्रत्येकासाठी एक कसोटी आहे. कोणत्याही दबावाशिवाय सत्याचा स्वीकार करणे माणसासाठी आवश्यक आहे. कोणत्याही सक्तीशिवाय त्याने सत्यापुढे शरणागती पत्करावी. तो स्वत:च्या पसंतीनेच आपल्या स्वातंत्र्यास मर्यादा घालतो. सत्यापुढे शरणागती पत्करणे हे प्रत्येक माणसाने केलेला स्वार्थत्याग आहे. सत्यास मान्य करणे म्हणजे, दुसऱ्यांहून स्वत:स कमी लेखणे. परंतु हीच अवस्था माणसास अत्युच्चपदी घेऊन जाते. स्वर्गातील त्याच्या प्रवेशाची ती हमी आहे.

याच संदर्भात शिस्तबद्ध जीवनशैली ही दुसरी महत्वाची बाब आहे. माणसाचे चारीत्र्य प्रामुख्याने त्याच्या भावनांनी घडते-राग, द्वेष, मत्सर, हेवा, वैमनस्य इत्यादी. हे सर्व नकारार्थी असले तरी यातूनच माणसाचे व्यक्तिमत्व विकसित होते. माणसाने तत्त्वांवर आधारित जीवन अंगिकारावे. बहिस्थ प्रभावाने त्याने आपले चारीत्र्य घडऊ नये. त्याचे चारित्र्य तत्त्वांवर आधारित असावे. उदात्त तत्त्वप्रणालीच्या चौकटीत इच्छाशक्तीने त्याने त्याच्या व्यक्तिमत्वास आकार द्यावा. यास स्वर्गीय चारित्र्य असे म्हणतात.

निर्मिती योजनेनुसारच माणसाची निर्मिती करण्यात आली आहे. या संपूर्ण जीवसृष्टीत माणूस सर्वाधिक श्रेष्ठ आहे. माणसाचे अस्तित्व अद्धितीय आहे. संपूर्ण जीवसृष्टीत असे दुसरे उदाहरण नाही. सर्व जैवविविधतेत माणसास सर्वश्रेष्ठ म्हणले जाते ते बरोबर आहे. तो सर्वश्रेष्ठ आणि अर्थपूर्ण आहे.

## मृत्युपश्चात जीवन

उत्तर आणि दक्षिण धृवावरील समुद्रात तरंगणारे हिमपर्वत चक्राऊन टाकणारे आहेत आणि म्हणून निसर्गात आढळणारा हा भयानक दृक्चमत्कार आहे. बाह्यरूप कितीही प्रचंड आणि अद्भुत असले तरी त्याचा एकदशांश भागच आपणास दिसतो. समुदाच्या पृष्ठभागाखाली दृष्य परिमितीच्या पलीकडे जे काही आहे त्यापासून सावध नसणाऱ्यांसाठी धोका आहे. अर्थात काही प्रमाणात आपले जीवन या तरंगणाऱ्या हिमपर्वतासारखे आहे. या जगामध्ये आम्ही जेवढे जीवन व्यतीत करतो, साधारण शंभर वर्षे अथवा

त्याहून थोडे कमी, ते या हिमपर्वताच्या पृष्ठभागावर दिसणाऱ्या भागाप्रमाणे आहे. आम्ही तो पाहू शकतो, त्यास स्पर्श करू शकतो. त्याची आम्हाला संवेदना होऊ शकते. आम्ही त्याचा आकार मापू शकतो. परंतु जो भाग पाण्याखाली आहे. त्याप्रमाणेच मृत्युनंतर येणारे आमचे जीवन आहे. आमच्या कल्पनाशक्तीला ते आव्हान देणारे आहे. परंतु आम्हाला त्याचे आकलन होणे आवश्यक आहे. कारण मनुष्यजीवनासंबंधी अल्लाहकडून निवाडा करण्यात आलेले ते जीवन आहे आणि ते शाश्वत आहे.

आमच्या उगमासंबंधी वास्तवाशी त्याचप्रमाणे जन्मापासून मृत्युपर्यंतच्या आमच्या प्रवासासंबंधी आम्ही परिचित आहोत. मात्र या जीवनाच्या अखेरीस तारूण्य असो, की वृद्धापकाळ, ज्या गोष्टींशी आम्ही परिचित आहोत त्या संपुष्टात येतात. मृत्यु म्हणजे संपूर्ण आणि अंतिम विनाश अशी कल्पना केली जाते. परंतु ते तसे नाही. मृत्यु म्हणजे दुसऱ्या उदरात अर्थात जीवसृष्टीच्या उदरात सुपूर्द करण्याची प्रक्रिया आहे. त्या दृष्टीकोनातून आमची ही दुसऱ्या जगाशी भेट आहे. अर्थात मृत्युपश्चात जीवन! जसे आम्ही जाणले, सद्याचे भौतिक जग मर्यादित कालावधीसाठी आहे. मृत्युपश्चात अमर्याद कालावधीसाठी आहे. या जगातील आणि मृत्युपश्चात जगातील आनंद आणि दु:ख समांतर आहेत अशी आपण कल्पना करतो. परंतु प्रत्यक्षात मृत्युपश्चात जीवनांतील आनंद अथवा व्यथा आणि या जगात आम्ही अनुभव घेत असलेली कोणतीही गोष्ट यामध्ये साधर्म्य नाही. मृत्युपश्चात जीवनात ज्यांना शिक्षा होईल त्यांना सदैव भयंकर शिक्षा प्रदान होईल. आणि ज्यांना अल्लाहची कृपा बहाल होईल त्यांना सर्वाधिक प्रसन्नता आणि समाधान प्राप्त होईल.

या जगातील जीवनाचा हेतू कसोटी आहे. त्यामुळे मृत्युपश्चात जग आमच्या आवाक्या बाहेर आहे. परंतु आमच्या अवतीभोवती अनेक संकेत आहेत. ज्यांच्यामध्ये साम्य आहे. त्या माध्यमातून आम्हाला येणाऱ्या जगाच्या स्वरूपाची कल्पना येऊ शकते. कल्पना करा. एक खोली आहे. तिला चार भिंती आहेत. त्यामध्ये फर्निचर आहे. काही इतर वस्तू आहेत. काही माणसे त्यामध्ये राहात आहेत. हे सर्व त्या खोलीचे बाह्य रूप आहे. परंतु ज्या क्षणी आम्ही टी.व्ही. सुरू करतो, त्या क्षणी रंग, गती आणि संभाषणाद्वारे जगाची

आम्हाला ओळख होते. हे जग त्याच्या सर्व देखाव्यांसह आणि जिवंत मानवासह सतत अस्तित्वात आहे याची ओळख होण्यासाठी स्वीचच्या एका झटक्याची गरज आहे. त्याचप्रमाणे आमचे ऐहिक जीवन जगामधील जगात घडवण्यात आले आहे. आम्हास माहित असलेले जग प्रत्यक्ष दिसणारे आहे, स्पर्शज्ञेय आहे. परंतु यामधील दुसरे जग मानवी स्पर्शज्ञानाने समजू शकत नाही. नेमके ते कसे आहे याचे आकलन होत नाही. केवळ मृत्युच आमच्यासाठी हे करू शकतो. आणि ज्यावेळी आम्ही मृत्युनंतर आमचे डोळे पुन्हा उघडतो त्यावेळी आमच्या लक्षात येते, की जे मानवी आकलनशक्तिपलिकडचे ते एक वास्तव आहे. जे अदृष्य होते, ते अस्तित्वात आहे.

## यश म्हणजे काय?

मृत्युपश्चात जीवन आहे, हे आमच्या मनांत स्पष्ट झाल्यानंतर भावी जीवनांत यश प्राप्त होण्यासाठी आपणास ऐहिक जीवनात प्रयत्न करावा लागेल, हेच आमचे ध्येय आमच्या लक्षात येते. कारण सद्याचे जग क्षणभंगुर आहे आणि भावी मृत्युपश्चात जग शाश्वत आहे. या जगात आम्हाला होणाऱ्या यातना आणि मिळणारे समाधान आणि मृत्युपश्चात जगात होणाऱ्या यातना आणि मिळणारे समाधान यामध्ये तुलना होऊ शकत नाही.

अनेक लोक अनैतिक, गुन्हेगाराचे जीवन जगतात, कारण या जगामध्ये आमच्या इच्छेनुसार काहीही करण्यास आम्ही मुक्त आहोत. इथे आम्हाला स्वातंत्र्य आहे असे वाटते, परंतु हे स्वातंत्र्य पाप आणि पुण्य यामध्ये अल्लाहस भेद करता यावा, त्याचप्रमाणे मृत्युपश्चात सन्मानाची आणि प्रतिष्ठेची जागा कोणास बहाल करण्यात यावी आणि मानहानीकारक शिक्षा कोणास देण्यात यावी याबाबतीत निवाडा करण्यासाठी आहे. मृत्युपश्चात जगात चांगले आणि वाईट म्हणजे भुसकटातून गहू वेगळे करण्यासारखे आहे. या जीवनात केलेल्या कृत्यांच्या नोंदणीनुसार काटेकोरपणे न्याय करण्यात येईल. काहींना मानहानीकारक नरकात कायमचे पाठवण्यात येईल, तर काहींना कृपा लाभलेल्या स्वर्गात! प्रत्येकास त्याच्या गुणवत्तेनुसार मोबदला

प्राप्त होईल.

## अल्लाहभिमुख जीवन

पृथ्वी हा सूर्याचा एक उपग्रह आहे. ती सतत सूर्याभोवती फिरते. अशी एक चक्रगती पूर्ण करण्यासाठी तिला पूर्ण एक वर्ष लागते. पृथ्वीवरील सुदृढ जीवनासाठी पृथ्वीचे सूर्याभोवती फिरणे आवश्यक आहे. जर पृथ्वी सूर्याभोवती फिरत नसती तर तिच्या अस्तित्वास काहीच अर्थ राहिला नसता आणि जीवनच संपुष्टात आले असते.

या जगात आपण कसे राहावे याचे हे व्यावहारिक उदाहरण आहे. हे भौतिक प्रात्यक्षिक आहे. अशाप्रकारे माणसाने अल्लाहभोवती फिरले पाहिजे. याचाच अर्थ असा की माणसाच्या सर्व कृती अल्लाहवर आधारित असणे आवश्यक आहे.

निसर्गनियमानुसार पृथ्वी फिरते. परंतु माणसास स्वेच्छेने अल्लाहपुढे शरणागती पत्करावयाची आहे. अल्लाहच्या संकल्पनेवर त्याने आपल्या जीवनाची जडणघडण करणे आवश्यक आहे. ही सद्सद्विवेकबुद्धी खऱ्या अर्थाने माणसाचे आरोहन आहे. या सद्सद्विवेक बुद्धीतच यशाचे रहस्य आहे. अल्लाहची ओळख झाल्यानंतर अल्लाहभिमुख जीवनाचा प्रारंभ होतो. पुरूष असो, की स्त्री ज्यावेळी त्यांना अल्लाहची ओळख होते, त्यावेळी त्यांना सत्य उमगते. हे सत्य त्यांचे जीवन व्यापून टाकते. 'सत्य समजले', ही भावना भारावून टाकणारी आहे. यातूनच निरंतर श्रद्धा निर्माण होते, ज्यामुळे अयुष्यातील नैराश्य दूर होते. अल्लाह हा त्यांच्यासाठी अमूल्य ठेवा आहे.

अल्लाहच्या निर्मिती संदर्भात चिंतन केल्यास माणसास हा अनुभव येतो. सद्याचे विश्व अल्लाहच्या विशेष गुणधर्मांचे प्रत्यक्षिक आहे. त्यावरून अल्लाहची स्पष्ट ओळख होते.

विस्तीर्ण अवकाशाप्रमाणेच अल्लाह विस्तीर्ण आहे. सूर्य आणि तारे यावरून अल्लाह प्रकाश आहे हे लक्षात येते. पर्वताच्या उंचीवरून त्याचे श्रेष्ठत्व लक्षात येते. समुद्राच्या लाटा आणि नदीचा प्रवाह यावरून अल्लाह म्हणजे अमर्याद कृपाभांडार आहे हे लक्षात येते. झाडांच्या हिरवेपणात अल्लाहचे

सौंदर्य दिसून येते. माणसाचे अस्तित्व हाच अल्लाहच्या अस्तीत्वाचा पुरावा आहे. हवेच्या प्रवाहात एका सुखद स्पर्शाची माणसास अनुभूती येते. पक्षांच्या चिवचिवाटात अल्लाहचे गीत तो ऐकत असतो. अल्लाहचे स्मरण या माध्यमातूनच माणूस अल्लाहभिमुख आयुष्याची सुरुवात करतो. अल्लाहच्या अस्तित्वाची जाणीव त्याला होऊ लागते. प्रत्येक गोष्ट त्याला अल्लाहची आठवण करून देते. त्याच्या दृष्टीत आणि मनांत सतत अल्लाहचे स्मरण असते. आपण अल्लाहच्या समीप आहोत असे सकाळ, संध्याकाळ त्याला वाटत असते. पावसामुळे पीक पुन्हा सतेज होते, त्याप्रमाणे अल्लाहचे स्मरण करण्यात तो नेहमी मग्न असतो.

## आध्यात्मिक विकासाचे उगमस्थान

माणसासाठी अल्लाह आध्यात्मिक स्रोत आहे. ज्याचे मन अल्लाहजवळ केंद्रित झाले आहे त्यास प्रत्येक क्षणी आध्यात्मिक अनुभूती होत असते. अल्लाहच्या प्रेमाने भारावलेल्या माणसास इतर कशाचीही गरज नसते. अल्लाह त्याच्यासाठी एखाद्या समुद्राप्रमाणे असतो. कोणत्याही मर्यादेखेरीज तो त्यात पोहत असतो. आध्यात्मिक जागृतीमुळे अन्य कशाचीही त्यास गरज भासत नाही.

अल्लाहचा शोध ज्यास लागला, त्याच्यासाठी संपूर्ण सृष्टी अल्लाहचा एक खुला ग्रंथ आहे. वृक्षाचे प्रत्येक पान या ग्रंथाच्या प्रत्येक पानासारखे आहे. ज्यावेळी तो सूर्य पाहतो, त्यावेळी अल्लाहने स्वर्गीय दिवा प्रकाशित केला आहे असे त्याला वाटते. त्यामुळे त्याने त्याचा हा ग्रंथ स्पष्टपणे वाचावा अशी त्याची इच्छा होते. जणूकाही सृष्टी त्याच्यासाठी विद्यापीठ आणि तिचा तो विद्यार्थी!

अल्लाहचा शोध घेणे म्हणजे त्याच्या प्रेमाचा शोध घेणे. जन्मापासूनच माणूस सर्वश्रेष्ठ निर्मात्याच्या शोधात आहे. तो त्याच्यापासून खूप उंच ठिकाणी आहे. सर्व मर्यादांपासून मुक्त आहे. त्याच्या संवेदनांच्या केंद्रस्थानी आहे. थोडक्यात त्याचा शोध लागल्यानंतर मोठ्या माणसास आईच्या हातात पकडलेल्या लहान बालकाप्रमाणे वाटते. अल्लाहखेरीज त्याच्याजागी दुसरा कोणी आहे ही संकल्पना चुकीची आहे. अल्लाहचा खऱ्या अर्थाने शोध घेणे हीच

शोध घेणाऱ्याची खरी उर्जा असते, ज्याची त्याला अत्यंतिक गरज आहे.

अल्लाहचा शोध घेण्यामध्ये ज्यास अपयश येते तो अल्लाहच्या जागी दुसऱ्या कोणाचीही प्रतिष्ठापना करतो. ही जागा एखाद्या मनुष्यास, एखाद्या प्राण्यास, नैसर्गिक प्रतिकृतीस, एखाद्या भौतिक शक्तीस, स्वतःच्या काही संकल्पनेस अथवा स्वतःसच देण्यात येते.

जर एखाद्यास अल्लाहचा शोध लावण्यात अपयश आले, अथवा तो नाकारणारा झाला तरी अल्लाहचा शोध घेण्याची स्वाभाविक उत्कंठा त्याला किंवा तिला दाबून टाकता येत नाही. त्यामुळे ज्यांना अल्लाहचा शोध लागत नाही. ते अल्लाहऐवजी दुसरेच काही तरी गृहित धरतात. अल्लाहची प्रार्थना करणाऱ्याची प्रतिष्ठा वाढते. याविरुद्ध त्याच्या जागी दुसऱ्या प्रतिकृतीची प्रतिष्ठापना करणारा मानवतेच्या पातळीपासून खाली कोसळतो. मानव आणि सृष्टी दोन्हींसाठी अल्लाहस समर्पित होणे हा एकमेव मार्ग आहे.

## अल्लाहचे पैगंम्बर

इतर धर्मांपेक्षा पैगंम्बारांबद्दल इस्लाम धर्माची संकल्पना भिन्न आहे. काही धर्मानुसार पालनकर्ता स्वतःच मानवी रूप धारण करतो आणि त्यांचे प्रेषीत मानवाहून खूप उच्चपदावर आहेत. इस्लामध्ये प्रेषीत माणसापेक्षा भिन्न नाहीत. अल्लाहने संदेशवाहक म्हणून केलेली निवडच त्याना अद्धितीय बनवते. इतर माणसांप्रमाणेच अल्लाहच्या प्रेषितांचा या जगात जन्म झाला. दुसऱ्याप्रमाणेच त्यांनी आपले जीवन व्यतीत केले. मात्र अल्लाहचे सेवक म्हणून व्यवहारात कसे वागावे हे त्यांनी लोकांच्या निदर्शनास आणले. त्याचप्रमाणे अल्लाहची नापसंती टाळण्यासाठी कोणत्या मार्गाचा अवलंब करावा आणि त्याच्या कृपेस कसे पात्र ठरावे हेही त्यांनी दाखऊन दिले.

## पैगंम्बर मुहम्मद (स.)

अरबस्तान हे आफ्रिका, आशिया आणि युरोपच्या मध्यभागी आहे. या प्रदेशावर कोणीही आक्रमण केले नव्हते, अथवा कोणत्याही सम्राटाने यावर राज्य केले नव्हते. इराक, सीरीया आणि पॅलेस्टाईन यावर लष्करी कारवाया

झाल्या होत्या. मात्र अरबस्थानच्या इतिहासात ते युद्धासाठी योग्य असल्याचे कोणासही वाटत नव्हते. त्याचे तीनही किनारे तीन समुद्राने वेढले आहेत आणि भूप्रदेश वाळवंट आणि पर्वतांनी व्यापला आहे.

## आरंभीचा कालखंड

मक्का हे या प्रदेशातील मध्यवर्ती शहर! अशा या प्रदेशात पैगंम्बर मुहम्मद (स.) यांचा २२ एप्रिल, ५७० रोजी जन्म झाला. त्यापूर्वी काही महिने त्यांचे वडील आजोबा अब्दुल मुतल्लिब, यांचे पुत्र अब्दुल्ला यांचे निधन झाले होते वयाच्या सहाव्या वर्षी आई आमिना हिचेही निधन झाले. दोन वर्षे आजोबा अब्दुल मुतल्लिब यांनी त्यांना सांभाळले. त्यानंतर त्यांचेही निधन झाले आणि अबु तालीब पैगंम्बरांचे पालक झाले. पैगंम्बर मदीनेस स्थलांतरित झाले त्यापूर्वी तीन वर्षांपर्यंत अबु तालीब हयात होते. त्यानंतर कोणत्याही संरक्षणाविना पैगंम्बरांना राहावे लागले. अर्थात पैगंम्बरांचे व्यक्तिमत्व असामान्य होते. ज्यानी त्यांना त्यांच्या तारुण्यात पाहिले ते म्हणत असत, “या मुलाचे भवितव्य खूप उज्ज्वल आहे.”

वय वाढत गेले. त्याना जे पाहात होते त्यांना त्यांचे व्यक्तिमत्व प्रभावित करत होते. मृदुभाषिक आणि मनमिळाऊ असल्यामुळे त्यांच्या संपर्कातील प्रत्येक जण त्यांच्यावर प्रेम करीत असे. अत्यंत विलोभनीय व्यक्तिमत्व - सहनशील, सत्यवचनी, आणि उदार! माणसाच्या असामान्य गुणवैशिष्ट्यांचे ते मूर्तिमंत उदाहरण होते. जसे वयस्कर झाले तसे लोक त्यांना दुर्बलांचा रक्षणकर्ता, धीरोदात, सत्यवचनी, विश्वासू आणि चांगला शेजारी म्हणून ओळखू लागले. सर्व प्रकारच्या भांडणतंट्यापासून ते अलिप्त राहात असत. निरर्थक संभाषण, शिविगाळ करणे, उद्धटपणे बोलणे त्यांच्या स्वभावात नव्हते. लोक आपल्या अमूल्य वस्तू त्यांच्या सुपूर्द करीत असत. त्यांना माहित होते, की त्यांच्याकडून कधी धोका होणार नाही. या विश्वासामुळे लोक त्यांना अल्-अमीन अर्थात विश्वस्त असे म्हणू लागले.

# सत्याचा शोध

त्यांच्यातील उपजत गुणांमुळे मक्कामधील चाळीशीतील एक श्रीमंत व्यापारी विधवा महिला खदीजा प्रभावित झाल्या. पैगंम्बर पंचवीस वर्षांचे होते, त्यावेळी खदीजाकडून त्यांना विवाहासंबंधी प्रस्ताव आला, यामुळे केवळ संपत्ती आणि मालमत्ताच नव्हे, तर अरबस्थानातील आणि त्या बाहेरील संपूर्ण व्यापाराचे क्षेत्र त्यांच्यासाठी खुले झाले. एक यशस्वी आणि सुखी जीवन जगण्याची त्यांना ही संधी होती. परंतु त्यांनी या सर्वांचा त्याग केला. स्वत:साठी एका वेगळ्याच मार्गाचा अवलंब केला. हा असा मार्ग होता की, ज्यामुळे त्यांचे ऐहिक जीवन छिन्नविछिन्न झाले. विवाह होण्यापूर्वी वेगळ्याप्रकारचे त्यांचे जीवन होते. त्यांनी ते सर्व सोडून दिले आणि ते सत्याच्या शोधात मग्न झाले. निर्मितीच्या रहस्याची ओळख करून घेण्यासाठी तासन्तास ते बसत असत आणि चिंतन करीत असत. अरबस्थानांतील उमरावांमध्ये बसण्याऐवजी ते वाळवंटात डोंगरकपारीत भटकू लागले. मक्केपासून तीन मैल अंतरावरील हीरा पर्वतावर ते एकान्तवासात बसू लागले. त्यांच्याजवळील भोजनाचे पदार्थ आणि पाणी संपेपर्यंत ते तेथेच बसत असत. त्यानंतर ते घरी येत असत आणि जेवणाचे पदार्थ इत्यादी घेऊन पुन्हा प्रार्थना आणि चिंतन करण्यासाठी एकान्तवासात जात असत. आपल्या मनात घर केलेल्या प्रश्नांसंबंधी ते आकाश आणि पृथ्वीच्या निर्मात्यास प्रश्न विचारीत असत. जीवनांत आपली खरी भूमिका काय आहे? सेवक म्हणून पालनकर्त्याची आपल्याकडून काय अपेक्षा आहे? आपण कोठून आलो आणि मृत्युनंतर कोठे जाणार? मानवी गदारोळात या प्रश्नांची उत्तरे सापडणार नाहीत म्हणून त्यांनी वाळवंटातील एकान्तवासात आश्रय घेतला. कदाचित याठिकाणी उत्तर सापडेल या अपेक्षेने. अखेर अल्लाहने या तणावातून त्यांची सुटका केली. त्याने पैगंम्बरांवर कृपा केली. त्यांचा मार्ग प्रकाशमान केला आणि पुढील प्रवासासाठी त्यांना मार्गदर्शन केले. १२ फेब्रुवारी ६१० इ. रोजी पैगंम्बर गुहेमध्ये एकटेच बसले होते. अल्लाहचा दूत मानवी रूपात त्यावेळी अचानक त्यांच्यासमोर अवतीर्ण झाला. त्याने त्यांना काही शब्दांचे ज्ञान दिले. जे कुरआनच्या ९६ व्या सूर:मध्ये समाविष्ट करण्यात आले आहेत.

पैगंम्बरांच्या शोध मोहीमेस असे बक्षिस मिळाले. त्यांच्या अस्वस्थ मनास अल्लाहच्या सानिध्यात समाधान मिळाले. अल्लाहचे केवळ मार्गदर्शनच नव्हे तर त्याने त्यांना पैगंम्बरी बहाल केली आणि जगासाठी प्रतिनिधी म्हणून त्यांची निवड केली. पैगंम्बरांचे कार्य सतत तेवीस वर्षे चालले होते. या कालावधीत अल्लाहचा अखेरचा ग्रंथ अर्थात संपूर्ण कुरआनचे त्यांच्यावर प्रकटीकरण झाले.

अत्यंत खडतर आयुष्यात वयाच्या चाळीसाव्या वर्षी पैगंम्बर मुहम्मद यांना सत्याचा शोध लागला. सहजासहजी, आरामात ते प्राप्त झाले नव्हते. याचवेळी अल्लाहपुढे त्यांना प्रत्यक्ष समोरासमोर उभे राहावे लागले. अल्लाहच्या सामर्थ्यापुढे त्याना त्यांच्या दुबळेपणाचे आणि अल्लाहच्या भव्यतेपुढे स्वत:च्या क्षुल्लकपणाचे सत्यही त्यांना उमगले. या शोधाबरोबरच हे स्पष्ट झाले की, या जगात अल्लाहचा सेवक म्हणून त्यांना त्यांचे कर्तव्य पार पाडावयाचे होते. मात्र त्यांना स्वत:स कोणताही अधिकार नव्हता.

खालील शब्दांवरून पैगंम्बरांच्या जीवनाचे मर्म लक्षात येते. ते म्हणतात, माझ्यावर नऊ प्रकारच्या जबाबदाऱ्या अल्लाहने सोपवलेल्या आहेत:-

१. खाजगीत आणि सार्वजनिक ठिकाणी अल्लाहचे भय बाळगावे,

२. रागात अथवा शांत असताना न्यायोचित असावे,

३. गरीबीत अथवा श्रीमंतीत संतुलित राहावे,

४. मला सोडतील त्यांच्या हाती मी हात द्यावा,

५. माझी फसवणूक करणाऱ्यांना मी लाभान्वित करावे,

६. माझ्यावर अन्याय करतील त्याना माफ करावे.

७. माझे मौन, माझे चिंतन असावे,

८. माझे शब्द अल्लाहचे स्मरण असावे,

९. माझी दृष्टी सूक्ष्म निरीक्षण करणारी असावी.

हे केवळ बोलके शब्द नसून यांत पैगंम्बरांच्या प्रत्यक्ष जीवनाचे प्रतिबिंब आहे. निरर्थक आत्म्यातून प्रकट झालेले हे शब्द नाहीत. ते मर्मभेदक आहेत. व्यक्त करणाऱ्याची ऊर्जा दर्शवणारे आहेत. आंतरमनातील उत्कट

भावना व्यक्त करणारे आहेत. शब्दांतून व्यक्त झालेली ती अशमनीय ऊर्जा आहे.

थोडक्यात अल्लाहच्या सेवकाचे जीवन असे होते. कधीकधी यामुळे ते अल्लाहच्या अधिक निकट येत असत. अल्लाहपुढे लेखाजोखा सादर करावा लागेल या भीतीपोटी ते स्वत:चा लेखाजोखा तपासून पाहात असत. आत्मपरीक्षण करीत असत. अल्लाहच्या निर्मितीने ते इतके भाराऊन जात असत, की अल्लाहचे सौंदर्य त्यांना दिसत असे. अल्लाहच्या सानिध्यात आणि सभोवतालच्या जगात असा त्यांचा वेळ जात असे.

या शब्दात पैगंम्बरांच्या व्यक्तिमत्वाचे प्रतिबिंब आहे. त्यांच्या ह्रदयात प्रज्वलित झालेला श्रद्धेचा एक प्रकाशझोत आहे. हे क्षण पैगंम्बरांच्या जीवनापासून अविभाज्य होते.

अल्लाहच्या शब्दांचे प्रज्ञान होईपर्यंत हे जग त्यांना अर्थहीन वाटत होते. परंतु ज्यावेळी या जगाखेरीज एक दुसरे जग आहे जे शाश्वत आहे याचे त्यांना ज्ञान झाले त्या वेळी जीवनास आणि या सृष्टीस एक नवा अर्थ प्राप्त झाला. त्यांचे अंत:करण आणि ह्रदय दृढावले.

हे वास्तव बौद्धिक पातळीत उमगले नव्हते. ते असे वास्तव्य आहे की, ज्यामुळे माणसाची पातळी उंचावते. पैगंम्बर मुहम्मद यांनी जीवनशैलीचे अत्युच्च उदाहरण आपणास सादर केले. त्यांच्या जीवनातून जो सर्वाधिक मोठा धडा त्यांनी दिला आहे तो असा की, जोपर्यंत माणूस आपली जीवनशैली बदलत नाही, तोपर्यंत त्याच्या कृतीमध्ये परिवर्तन होणार नाही.

ज्यावेळी पैगंम्बरांना मृत्युपश्चात जीवनाची ओळख झाली, त्यावेळी त्यांच्या जीवनशैलीत अमुलाग्र परिवर्तन झाले आणि संपूर्ण आयुष्यभर ते प्रभावित राहीले. ते स्वत:च स्वर्गाचे इच्छुक झाले आणि ही शुभवार्ता त्यांनी इतरांना दिली. ज्याची इतरांना त्यांनी सूचना दिली त्या नरकाची त्याना भीती वाटत नव्हती. आंतरयामी भावी जीवनासंबंधी चिंता ते करीत असत. प्रार्थना अथवा पश्चाताप याद्वारे कधीकधी ती व्यक्त होत असे. सर्वसामान्य व्यक्तीहून वेगळ्याच पातळीवर आपले जीवन ते व्यतीत करू लागले. अनेक घटनांवरून हे दिसून येते. मृत्युपश्चात जीवनासाठी जगणे यासाठी या

जगातील जीवन आहे. जो हे ओळखतो, तो भावी जीवनाचे लक्ष्य उराशी बाळगतो.

मृत्युपश्चात जीवनाच्या विचाराने पैगंम्बरांचे जीवन घडत गेले. त्यांचे आपल्या मुलींवर खूप प्रेम होते. त्यांची अत्यंत आवडती कन्या फातेमा हिच्या हाता संदर्भात एकदा एक किस्सा हजरत अली इब्ने अबी तालिब यांनी सांगितला. चक्कीवर दळून फातेमा यांच्या हाताला फोड आले होते. पाणी भरून खांद्यास घट्टे पडले होते आणि झाडू मारून कपडे मलीन होत होते. एकदा एका ठिकाणाहून नोकरचाकरांचा एक जथा पैगंम्बरांकडे आला. त्यावेळी हजरत अली यांनी पैगंम्बरांकडे जाऊन एक नोकर देण्यासंबंधी त्यांना सांगावे असे फातेमास सुचवले. त्यानुसार फातेमा गेल्या. परंतु लोकांची खूप गर्दी असल्यामुळे फातेमा यांना बोलता आले नाही. दुसऱ्या दिवशी पैगम्बर फातेमा यांच्या घरी आले आणि कशासाठी त्या त्यांच्याकडे आल्या होत्या यासंबंधी विचारणा केली. हजरत अली यांनी सर्व कथा सांगितली आणि त्यांनीच फातेमा यांना पाठवले होते असे सांगितले. त्यावर पैगंम्बर म्हणाले, "फातेमा अल्लाहचे भय बाळगा. त्याच्याबाबतीत तुमचे कर्तव्य करा. घरकाम करण्याचे चालू ठेवा. आणि ज्यावेळी रात्री झोपण्याची तयारी कराल त्यावेळी अल्लाहची तेहेतीस वेळा स्तुती करा, (अलहम्दो लिल्लाह), तेहतीस वेळा त्याची प्रशंसा करा (सुबाहनल्लाह), तेहतीस वेळा आणि चौतीस वेळा त्याचा गौरव करा (अल्लाहु अकबर) म्हणजे शतक पूर्ण होईल. त्यावर "जर अल्लाह आणि त्याच्या पैगंम्बरांचीच इच्छा असेल तर त्याप्रमाणेच होईल" असे फातेमा यांनी उत्तर दिले. पैगंम्बरांनी त्याना नोकर दिला नाही.

या जगाची अशीच निर्मिती झाली नाही. अल्लाहनेच त्याची निर्मिती केली आहे हे सत्य पैगंम्बरांना उमगले होते. सर्व लोक त्याचे सेवक आहेत. त्यांच्या कृत्यांसाठी तेच जबाबदार आहेत. मृत्यु ही माणसाची अखेर नाही. ती भावी जीवनाची सुरुवात आहे. एक शाश्वत जग, जिथे पुण्यवंत स्वर्गाचा आनंद उपभोगतील आणि पापी नरकाग्नीत शिक्षा भोगतील. या सत्याबरोबरच आज्ञांचे प्रकटीकरण झाले. त्यानुसार सफाच्या उंच टेकडीवर पैगंम्बरांनी लोकांना एकत्रित केले. प्रथम त्यांनी अल्लाहच्या थोरपणाचे वर्णन केले. त्यानंतर ते म्हणाले, "शपथ अल्लाहची तुम्ही झोपता त्याप्रमाणेच तुम्हास

मृत्यु येईल. आणि तुम्ही झोपेतून जागे होता त्याप्रमाणे तुम्हाला उठवण्यात येईल. त्यानंतर तुमच्या कृत्यांबद्दल तुमची विचारपूस होईल. पुण्य करणाऱ्यांसाठी चांगला मोबदला आणि पाप करणाऱ्यांसाठी शिक्षा. पुण्यशील स्वर्गात राहातील आणि पापी नरकात!" शाश्वत जगाकडे लक्ष केंद्रित करणे हा पैगंम्बरांच्या शिकवणुकीचा केंद्रबिंदू होता. कोणत्याही परिस्थितीत त्यांची शिकवण ऐहिक जगांतील प्रकरणांत खिळून राहिली नाही. मृत्युपश्चात प्रारब्ध हा माणसापुढे खरा भेडसावणारा प्रश्न आहे. इतर प्रश्न क्षणिक आणि निरर्थक आहेत. ऐहिक जगातील यश अथवा अपयश यास काही अर्थ नाही. ते संपुष्टात येणारे आहे. यश आणि अपयश नंतरच्या जगात आहे. ज्यावर माणसाने आपले लक्ष केंद्रित केले पाहिजे.

दृढ व्यक्तींचा समाज घडविणे हे पैगंम्बरांचे ध्येय होते. नैतिकतेच्या आधारावर प्रत्येक व्यक्ति आचारण करू लागली तरच असा समाज घडू शकतो. मृत्युपश्चात जीवनावर श्रद्धा असेल तरच नीतीमत्ता वृद्धिंगत होते. आपल्या मर्जीप्रमाणे वागण्याची आम्हास अनुमती नाही. याचाच अर्थ मृत्युपश्चात जीवनावर विश्वास ठेवणे. पवित्र कुरआन आणि हदिस याचे वाचन केल्यास मृत्युपश्चात जीवनावर लक्ष केंद्रित होईल. इतर गोष्टी त्यामध्ये देण्यात आल्या आहेत, मात्र त्या प्रासंगिक आहेत. लोकांनी मृत्युपश्चात जीवनासाठी एकाग्रतेने वाटचाल करावी हाच पैगंम्बरांच्या शिकवणीचा मूलभूत सिद्धांत आहे.

## पवित्र ग्रंथ - कुरआन

कुरआन हे अल्लाहचे प्रकटीकरण आहे. त्यात ११४ सूरः आहेत. अल्लाहचे दूत जिब्रईल यांच्याद्वारे परीस्थितीनुसार अल्लाहकडून त्यांचे प्रज्ञान झाले. कोणत्याही व्यक्तीने ते लिहिलेले नाही. माणसाच्या भाषेत ते अल्लाहचे शब्द आहेत. इ.स. ६१० मध्ये जिब्रईल यांच्याद्वारे पैगंम्बरांवर कुरआनचे प्रकटीकरण होण्यास सुरुवात झाली. मक्का शहरापासून दोन मैल अंतरावर असलेल्या देदिप्यमान डोंगरातील हीरा या गुहेत पैगंम्बर एकांतवासात बसले असतांना पहिले प्रकटीकरण झाले. एकाच वेळी संपूर्ण ग्रंथाचे प्रकटीकरण झाले नाही. परिस्थितीनुसार वेगवेगळे खंड अवत्तीर्ण झाले. पैगंम्बरांच्या मदिना येथील

अखेरच्या टप्प्यात ते संग्रहित करण्यात आले. संपूर्ण ग्रंथाचे २३ वर्षात प्रकटीकरण झाले. इ.स. ६२२ मध्ये अखेरची हज यात्रा पूर्ण केल्यानंतर अराफात येथे लोकांना उद्देशून व्याख्यान देतांना अखेरचे प्रकटीकरण झाले.

## कुरआनातील विषय

अल्लाहच्या निर्मिती योजनेसंबंधी लोकांना जागरूक करणे हा पवित्र कुरआनचा मूळ विषय आहे. या योजनेनुसार शाश्वत म्हणून माणसाची निर्मिती करण्यात आली. निर्मात्याने माणसाच्या जीवनाची दोन भागात विभागणी केली. मृत्युपूर्व आणि मृत्युपश्चात! मृत्युपूर्व कालखंड माणसाच्या कसोटीचा कालखंड आहे आणि मृत्युपश्चात कालखंड बक्षिस अथवा शिक्षा यांचा कालखंड! पहिला क्षणभंगूर आहे. दुसरा शाश्वत आहे.

प्रत्येक माणसात बौद्धिक प्रगती व्हावी हा कुरआनचा उद्देश आहे. त्याची शिकवण आध्यात्मिक आहे. सर्व आयात मानवी मनास उद्देशून आहेत. निसर्गावर त्याने विचार करावा यासाठी कुरआनात तीन शब्द आहेत. तफक्कुर, तद्ब्बुर आणि तवस्सुम! आध्यात्मिक बैठक वृद्धिंगत करणे पवित्र कुरआनचे लक्ष्य आहे.

कुरआननुसार मानवी जीवनात हिंसेस स्थान नाही. इस्लामने मानवास स्वातंत्र्य दिले आहे. मात्र हिंसाचार करू नये अशी त्यात अट आहे. जर शांती हा माणसाचा हेतू असेल आणि त्याप्रमाणे त्याची वर्तणूक असेल तर तो आपले स्वातंत्र्य आपल्या मर्जीप्रमाणे उपभोगू शकतो.

अध्यात्म, नीतीमत्ता आणि शांती यांचे सर्व निकष पवित्र कुरआनमध्ये स्पष्टपणे देण्यात आले आहेत. पवित्र कुरआन म्हणजे कायद्याचे पुस्तक नाही. आत्मपरीक्षणासाठी हा ग्रंथ आहे. त्यासाठी पैगंम्बर मुहम्मद यांचे उदाहरण सादर करण्यात आले आहे. पैगंम्बर पूर्ण आयुष्य जगले. त्यांच्या व्यावहारिक आचरणात त्यानी पवित्र कुरआनच्या शिकवणीचे पालन केले. पवित्र कुरआनातील तत्त्वप्रणालीचे आकलन करण्याची इच्छा असेल तर कुरआनचा संदर्भ घ्यावा आणि पैगंम्बर मुहम्मद यांच्या जीवन चारित्राचा अभ्यास करावा. ज्यास सीराह असे म्हणतात.

विविध धर्म असलेल्या समाजात कुरआन हे अत्यंत व्यावहारिक आहे. त्याचा सिद्धांत पुढीलप्रमाणे आहे. तुमचा धर्म तुमच्यासाठी आणि माझा माझ्यासाठी. याचाच अर्थ एकाचे पालन करा आणि सर्वांचा आदर करा. म्हणजे या जगातील अस्तित्व शांततामय सहजीवन यावर अवलंबून आहे. 'अल्लाहच्या नावांने जो सर्वाधिक कृपाळू नि द्याळू आहे.' कुरआनमधील प्रत्येक सुर:ची सुरुवात याने करण्यात आली आहे. कोणत्याही कामाची सुरुवात करण्यापूर्वी अल्लाहचे नांव घेण्यात यावे. हा यामागे हेतू आहे. यामुळे अल्लाहची द्या आणि कृपा याचे पुन:पुन्हा स्मरण होते.

कुरआनच्या शिकवणीचे दोन प्रमुख वैशिष्टे आहेत.

१. अल्लाह एकच आहे. यावर श्रद्धा ठेवणे. म्हणजेच अद्वैतवाद आणि त्याचीच प्रार्थना करणे.

२. मानवी बंधुभाव अर्थात सर्व मनुष्यजात एकच आहे आणि सर्वांना समान हक्क आहेत. म्हणजेच एकेश्वरवाद आणि न्याय!

## मानवजातीसाठी द्या

११४ सूर:मध्ये साधारण ६००० हून अधिक आयात आहेत. माणसाने अल्लाहची प्रार्थना करावी आणि मानवजातीबद्दल त्याने सदिच्छा बाळगावी या दोन उदात्त गुणधर्मांचा यामध्ये पुरस्कार करण्यात आला आहे. कुरआनच्या तत्वप्रणालीनुसार माणसाचे जीवन अल्लाह आणि मानव याने बांधले गेले आहे. एका बाजूला त्याचा निर्माता अल्लाह तर दुसऱ्या बाजूला माणूस आहे. अल्लाहसंबंधी माणसाने उदात्त भावना बाळगण्यात कुरआनद्वारे प्रेरणा मिळते. माणूस ज्याप्रकारे अल्लाहची प्रार्थना करतो त्याप्रकारे त्याच्या या भावना प्रकट होतात. त्याचवेळी समस्त मानवजातीसाठी त्याच्या मनांत करुणा असावी हे स्पष्ट करण्यात आले आहे. खरा मुस्लिम होण्यासाठी या दोन गुणवैशिष्ट्यांची आवश्कता आहे.

अल्लाहने मानवतावादासाठी अगणित कृपांचा वर्षाव केला आहे. असे कुरआनमध्ये म्हटले आहे. त्यासाठी कृतज्ञता व्यक्त करणे माणसाचे कर्तव्य आहे. त्याने अल्लाहवर प्रेम केले पाहिजे, त्याची भीती बाळगली पाहिजे. त्याची

ही जबाबदारी आहे.

आत्मपरीक्षण करून आणि अल्लाहशी एकरूप होऊन प्रत्येकाने आपले चारित्र्य घडविले पाहिजे. यास कुरआनने प्राधान्य दिले आहे. हिंसा अथवा मानवी विध्वंस यास कुरआनमध्ये कोणतेही स्थान नाही.

पित्याचे आपल्या मुलांबाळांशी जे नाते असते तसेच अल्लाहचे प्रत्येक माणसाबरोबर नाते आहे. आणि म्हणून पृथ्वीतलावर हिंसाचार करण्यात येऊ नये आणि स्वेच्छेने अल्लाहच्या निर्मिती योजनेस बेसूर करण्यात येऊ नये. द्वेषाच्या जागी प्रेम आणि हिंसेच्या जागी शांतता निर्माण व्हावी ही अल्लाहची इच्छा आहे आणि हिंसेचा शांततेने मुकाबला करावा.

## हदीस आणि सुन्नाः

हदीस याचा अर्थ निवेदन अथवा वृत्तांकन. पैगम्बर मुहम्मद यांनी जे कथन केले त्याच्या नोंदी अथवा इतिवृत्त यासाठी हदीस हा इस्लामिक शब्दप्रयोग आहे. सुन्नत म्हणजे पैगंम्बरांचे आचरण अथवा त्यांच्या आदेशाने त्यांच्या सहकाऱ्यांनी केलेल्या कृती. हदीस म्हणजे अशा कृतींच्या नोंदी, पैगंम्बरांनी केलेल्या कृती, पैगंम्बरांचे जीवन त्याचप्रमाणे कुरआनसंबंधी हदीसच्या माध्यमातून माहिती मिळते.

कुरआनमध्ये प्रामुख्याने मूलभूत तत्त्वप्रणाली आहे. हदीसमध्ये त्यासंबंधी आवश्यक माहिती आहे. उदाहरणार्थ प्रार्थना दृढ करा. असे कुरआनमध्ये म्हटले आहे. परंतु प्रार्थना कशी करावी यासंबंधी कुरआनमध्ये खुलासेवार सांगण्यात आलेले नाही. वेळ आणि प्रार्थनेच्या रकअतसंबंधी स्पष्टपणे सांगण्यात आलेले नाही. याबाबतीत संपूर्ण माहिती हदीसमध्ये उपलब्ध आहे. या व्यतिरिक्त पैगंम्बरांनी स्वतः लोकांना प्रात्यक्षिक दाखवले. ते म्हणाले, “माझ्याकडे पाहा. मी कशी प्रार्थना करतो. आणि त्याप्रमाणे तुम्हीही करा.” पैगंम्बरांच्या सूचनांचे आचरण करण्यासंबंधी कुरआनमध्ये सांगण्यात आले आहे. अल्लाहच्या आज्ञांचे पालन करा आणि पैगंम्बरांच्या आज्ञांचे पालन करा (अल् निसा ४:५९). थोडक्यात कुरआन हे पाठ्यपुस्तक आणि हदीस हे त्याचे भाष्य असे म्हणता येईल. किंवा कुरआन म्हणजे सिद्धांत आणि हदीस त्याची कृती. एकदुसऱ्यास पूरक आहेत आणि त्यामुळे

एकदुसऱ्यांपासून त्यांना वेगळे करता येत नाही.

पैगंम्बरांचे समकालीन जे त्यांचे सहकारी होते त्यांना सहाबा असे म्हणतात. सहकाऱ्यांची पैगंम्बरांनी दिलेल्या शिकवणीवर श्रद्धा होती. त्यामुळे पैगंम्बरांच्या सर्व कृती त्यांच्यासाठी प्रमाणभूत होत्या. प्रत्येक शब्द आज्ञा होती. त्यामुळे सर्वजण अत्यंत प्रामाणिकपणे त्यांचे पालन करीत असत. पैगंम्बरांच्या हयातीत त्यांचा प्रत्येक शब्द त्यांच्या अनुयायांनी स्मरणात ठेवला. आणि ते जे काही करत होते त्याचे बारकाईने निरीक्षण केले. त्यासाठी त्यांचे सहकारी अबु हुरैरा, आनस इब्ने मलिक आणि अब्दुल्ला इब्ने मसूद हे सतत पैगंम्बरांच्या संपर्कात राहात असत. पैगंम्बरांचे म्हणणे आणि त्यांच्या कृती सांगण्यात माहिलांमध्ये त्यांच्या पत्नी आयेशा पहिल्या. त्यांनी सुमारे दोन हजार हदीस कथन केल्या आहेत. तर अबु हुरैरा यांनी सुमारे पाच हजार हदीस कथन केल्या.

त्यानंतर अनेकांनी संकलन केले. यामध्ये प्रामुख्याने बुखारी आणि मुस्लिम यांचा उल्लेख करण्यात येतो. प्रत्येक हदीसची सत्यता पडताळून पाहण्यासाठी त्यानी अथक प्रयत्न केले. प्रत्येक हदीससाठी वृत्तांकन करणाऱ्यांच्या शृंखलेचाच त्यांनी मागोवा घेतला आणि हदीसच्या सत्यतेसाठी अशा लोकांच्या जीवनाचा सर्व दृष्टीकोनांतून अभ्यास केला.

## इस्लामचे पाच स्तंभ

पैगम्बरांनी म्हटले आहे इस्लामची इमारत पाच स्तंभावर उभी आहे.

१. अल्लाह एकच आहे आणि मुहम्मद हे त्याचे संदेशवाहक आहेत याची साक्ष देणे.

२. प्रार्थना अर्थात नमाज दृढ करणे.

३. विहित प्रमाणात जकात देणे (दानधर्म करणे).

४. मक्का येथे हजयात्रेसाठी जाणे.

५. रमजान महिन्यात उपवास करणे.

इमारतीचे अनेक भाग असतात. परंतु त्याच्या स्तंभांवरच ती उभी

असते. जर स्तंभ मजबूत असतील तर संपूर्ण इमारत भक्कम राहाते. जर कमकुवत असतील तर इमारत कोसळते. इस्लामला आधार देणारे स्तंभ मजबूत आहेत.

माणसाचे जीवन जमिनीच्या तुकड्याप्रमाणे आहे. ज्यावर त्यास अल्लाहच्या प्रसन्नतेचे निवास बांधावयाचे आहे त्यासाठी हे पांच मजबूत स्तंभ उभे करणे आवश्यक आहे. त्याखेरीज वैयक्तिक पातळीवर अथवा सामाजिक पातळीवर इस्लाम उभा राहाणार नाही. हे पाच स्तंभ श्रद्धा, नमाज, उपवास, दानधर्म (जकात) आणि हजयात्रा. यामुळे माणसांमध्ये दृयेची आणि अल्लाहबद्दल निष्ठेची भावना उद्दीपित होते.

ईमान (श्रद्धा) म्हणजे अल्लाहच्या सत्यतेवर विश्वास ठेवणे. नमाज याचा अर्थ अल्लाहच्या श्रेष्ठत्वापुढे झुकणे, त्यामुळे माणसामधील अहंभाव लोप पावतो. उपवासामुळे संयम आणि मनोधैर्य वृद्धिगंत होते. जकात (दानधर्म) यामुळे दुसऱ्यांच्या गरजांची ओळख होते. त्याचप्रमाणे अल्लाहने जे दिले आहे त्याची योग्य प्रमाणात विभागणी होते. हजयात्रा म्हणजे अल्लाहभोवती त्याच्या निष्ठावंतांचे एकत्र येणे. या केवळ पारंपारिक विधी नसून त्यात सकारात्मक गुणवैशिष्टें आहेत. जर आम्ही त्या वृद्धिगंत केल्या तर इस्लामध्ये अंतर्भूत गुणवैशिष्ट्ये जागृत होतील. अशाप्रकारे श्रध्दा, नम्रता, मनोधैर्य, दुसऱ्यांचे हक्क आणि ऐक्य या स्तंभांवर अल्लाहची पूर्ण इमारत उभी आहे.

## ईमान (श्रद्धा)

अल्लाह हाच पालनकर्ता यास समर्पित होणे म्हणजेच अल्लाहस जीवनाचा केंद्रबिंदू मानण्यासंबंधी प्रतिज्ञा करणे. त्यामुळे तोच आपल्या विचारांचा आणि भावनांचा केंद्रबिंदू बनतो. याचाच अर्थ स्वत:स पूर्णपणे त्याच्या सुपूर्द करणे. ऐहिक सामग्रीसाठी जगण्याऐवजी पालनकर्त्यासाठी जगणे, त्यामुळे जीवनांत तो सर्वेसर्वा: होतो.

माणूस बहुधा साधनसामग्रीसाठी जगत असतो. त्याच्या विचारांवर आणि भावनांवर त्याचा प्रभाव असतो. काही त्यांच्या घरांसाठी आणि

कुटुंबासाठी जीवन व्यतीत करतात. काही उद्योगधंद्यांसाठी आणि त्यातून मिळणाऱ्या पैशासाठी, काही राजकारणासाठी आणि पक्षाच्या नेतृत्वासाठी, तर काही प्रतिष्ठा आणि अधिकारासाठी जीवन जगतात. कोणताही माणूस मग तो छोटा असो, की मोठा, तो या जगात भौतिक प्राप्तीसाठी जगत असतो. परंतु हे अज्ञानात जगण्यासारखे आहे. अस्तित्वात नसलेल्या फांद्यांवर घरटी बांधण्याचा हा प्रकार आहे. त्याच्याखेरीज कोणाचाही आधार नसलेले पालनकर्त्यासाठी जगणे हेच खरे जीवन. अल्लाहचे स्मरण करण्यातच माणसाने आपले जीवन व्यतीत करावे. झोपताना आणि जागे असताना, त्याचे नाव त्याच्या ओठावर असावे. मार्गस्थ असताना, विसावा घेतात अथवा पुढे वाटचाल करताना त्याने अल्लाहच्या श्रद्धेत राहावे. संभाषण करणे अथवा शांत असणे पालनकर्त्यांच्या प्रसन्नतेसाठीच असावे.

## श्रद्धा म्हणजे काय?

श्रद्धा ही सर्व परिसर प्रज्वलित करणाऱ्या आणि यंत्रांना चालना देणाऱ्या विद्युत प्रवाहासारखी असावी. माणसाचा श्रद्धेच्या माध्यमातून ज्यावेळी अल्लाहबरोबर संबंध प्रस्थापित होतो त्यावेळी त्याला अचानक आणि सर्वस्पर्शी प्रकाशाची अनुभूती होते. आईच्या उदरातून जन्म घेतल्याप्रमाणे माणसास श्रद्धेच्या उदरातून दुसरा जन्म मिळतो. अल्लाहशी एकरूप होणे म्हणजे काय याची त्याला प्रचिती येते. प्रियकर प्रेयसीपासून दूर असला तरी भावनिक दृष्ट्या दोघे एकरूप असतात. या परिस्थितीत प्रत्येक वस्तूत प्रियकरास प्रेयसीची प्रतिमा दिसत असते. ऐहिक जीवनांतील या प्रेमाप्रमाणेच अल्लाहबाबत श्रद्धा निर्माण होते. निळ्या आकाशात त्याला अल्लाहची भव्यता दिसू लागते. आणि वादळवाऱ्याच्या झंझावातात त्याचा प्रकोप दिसू लागतो. चिवचिवाट करणारे पक्षी अल्लाहचे स्तुतीगान करीत आहेत असे वाटते. प्रत्येक पानावर, प्रत्येक रोपट्यावर निर्मितीची कहाणी तो वाचू लागतो. वाऱ्याची झुळुक अल्लाहशी त्याच्या एकरूपतेची शुभवार्ता देत असते. खरा श्रद्धावंत हा अध्यात्माच्या समुद्रात सूर मारतो. प्रत्येक वेळी त्याला निर्मात्याच्या सानिध्यात असल्याची अनुभूती येते. अशा प्रकारे तो अल्लाहचा आणि अल्लाह त्याचा होतो.

अल्लाहवर श्रद्धा म्हणजे सर्व जगाचा निर्माता, मालक आणि पालनकर्त्यावर श्रद्धा! प्रत्येक वस्तू त्यानेच आणि फक्त त्यानेच निर्माण केली आहे. त्याच्याखेरीज कोणतीच वस्तू अस्तित्वात नाही. याची जाणीव आणि अल्लाहवर श्रद्धा यांचा घनिष्ट संबंध आहे. श्रद्धावंत स्वतःस अल्लाहचा सेवक समजतो. याची जाणीव आणि अल्लाहवरील श्रद्धा हातातहात घालून चालतात. परिणामतः अल्लाहवर श्रद्धा बाळगणारा माणूस स्वतःस अल्लाहचा सेवक समजू लागतो. प्रत्येक गोष्टीत त्याला अल्लाहचा गौरव दिसू लागतो. तो त्याची स्तुती करत असतो आणि अल्लाहचे स्मरण त्याच्या हृदयातून एखाद्या झऱ्याप्रमाणे उफाळून येते. निष्काळजीपणात तो राहात नाही. अत्यंत जागरूकपणे राहातो. सर्व घटना त्याला अल्लाहचे स्मरण करून देत असतात. ज्यावेळी त्याला गाढ आणि उत्साहवर्धक झोपेतून जाग येते त्यावेळी अल्लाहने माणसास झोप देऊन त्याच्यावर कृपा केली असे त्याला वाटते आणि तो त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करतो. झोप नसती तर क्षणभंगुर जीवनातील ही थकण्याची अवस्था त्याला नरकावस्थे समान वाटली असती आणि तो भ्रमिष्ट झाला असता. ज्यावेळी सूर्य आकाशात वर येतो त्यावेळी तो आणि त्याचे किरण जगभर पसरतात आणि रात्रीचा अंधःकार नष्ट करतात. त्यावेळी परमानंदाने त्याचे हृदय भावनावश होऊन म्हणू लागते “अल्लाहची स्तुती! त्याने हा प्रकाश निर्माण केला. जर प्रकाश नसता तर संपूर्ण पृथ्वी अंधःकाराच्या सागरात बुडून गेली असती.” भूक आणि तहान याने ज्यावेळी तो त्रस्त होतो, त्यावेळी तो उपहार करतो. त्याचे हृदय कृतज्ञतेने भरून येते. तो आश्चर्यचकित होतो आणि स्वतःस विचारतो “जर अल्लाहने खाद्य आणि पेयजल पाठवले नसते तर काय झाले असते?” ज्यावेळी त्याला गरज भासते, अथवा त्याला इजा पोहोचते त्यावेळी तो अल्लाहकडेच याचना करतो. ज्यावेळी संकटाचा सामाना करण्याची वेळ येते त्यावेळी अल्लाहच्या नियोजनाचाच तो एक भाग आहे असे समजून तो त्याचा स्वीकार करतो. जर फायदा झाला तर त्याला अल्लाहच्या कृपेची जाणीव होते आणि अहंभावाने तो प्रेरित होत नाही. त्याचे अपयश त्याला चिरडत नाही अथवा तो अधीर होत नाही. फायदा असो कि नुकसान प्रत्येक बाबतीत अल्लाहबद्दल त्याच्या मनांतील आदरभावना कमी होत नाही. अल्लाहखेरीज दुसरे काहीही त्याचे ध्येय नसते आणि कोणताही स्वार्थ त्याला

अल्लाहचा विसर पडू देत नाही.

पृथ्वीतलावरील गुरुत्वाकर्षणाचा प्रभाव अथवा कृत्रिम साहित्याद्धारा मिळणारा प्रकाश याचे संशोधन पुस्तकी स्वरूपाची उपलब्धी आहे. अल्लाहचे संशोधन एक असाधारण अनुभूती आहे. सर्व पाहाणारा, सर्व ऐकणारा आणि बुध्दिमत्ता आणि सामर्थ्य याचे भांडार याची ती स्पष्ट प्रचिती आहे. अल्लाहचा शोध याचा अर्थ समस्त विश्व याची त्याने व्यर्थ निर्मिती केली नाही.

## सलात (नमाज)

प्रार्थना (सलात) हा इस्लामचा दुसरा स्तंभ आहे. यासाठी निर्धारित वेळेवर पांच वेळा अल्लाहची प्रार्थना (नमाज) अनिवार्य करण्यात आली आहे. पैगम्बरांच्या माध्यमातून रूढ करण्यात आलेली प्रार्थनेची पद्धत सर्वस्पर्शी आहे. त्याहून निर्मात्याच्या प्रार्थनेसाठी अधिक चांगल्या पध्दतीची कल्पना करता येत नाही.

प्रार्थनेची वेळ झाल्यानंतर स्वत:च्या उद्धारासाठी श्रद्धावंत लोकांनी नमाजसाठी येण्याचे अल्लाहच्या महतीचा पुकारा करुन (अजानद्धारे) आवाहन करण्यात येते. त्यानंतर वजू करण्यात येते. यामुळे वैयक्तिक स्वच्छतेची भावना जागृत होते. मन अल्लाहशी एकरूप होते. ते मशिदीकडे येतात आणि एकत्रित प्रार्थना करतात. इमाम प्रार्थनेचे नेतृत्व करतो. मुस्लिमांना आचरणासंबंधी तोच मार्गदर्शन करतो. सार्वजनिक प्रार्थनेचेही इमाम नेतृत्व करतो. अशाप्रकारे मुस्लिमांनी पैगंम्बरांना त्यांच्या सामाजिक अस्तित्वाचा केंद्रबिंदू बनवावा.

प्रार्थनेचे वेगवेगळे टप्पे आहेत. झुकणे, उभे राहाणे आणि अल्लाहपुढे गुढगे टेकणे. या विविध शारीरिक हालचालींद्धारा पालनकर्त्यास मुस्लिम समर्पित होतात. ते उभे राहतात, प्रार्थनेसाठी हात बांधतात, झुकतात, अल्लाहपुढे आदरभावनेने बसतात आणि त्यानंतर आपले कपाळ जमीनीवर ठेवतात. या प्रत्येक क्रियेत ते अल्लाहबरोबर समर्पित झाल्याच्या त्यांच्या प्रतिज्ञेस पुन: उजाळा देतात.

प्रार्थनेत पवित्र कुरआनमधील एक सूर:चे पठण करण्यात येते.

कोणत्याही सूर:ची निवड करण्यात येते आणि त्याचे पठण करण्यात येते. पवित्र कुरआनचे हे एक वैशिष्ट्य आहे. प्रत्येक पानात त्याचा संदेश आहे. त्यामुळे पवित्र कुरआनमधील लहानात लहान सूर:देखील अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी पुरेसा आहे.

याव्यतिरिक्त अल्लाहचा गौरव आणि त्याचे स्मरण याचा प्रार्थनेत समावेश आहे. अल्लाहपुढे याचना आणि पैगंम्बर आणि श्रद्धावंतांसाठी शुभेच्छा! समस्त मानवजातीसाठी एक संदेश देऊन प्रार्थना (नमाज) पूर्ण होते. अशाप्रकारे ही प्रार्थनेची कृती आहे. त्याचप्रमाणे यामध्ये अल्लाहच्या आदेशांचे पालन आहे. श्रद्धावंतांसाठी समाधान आहे. सामाजिक जागृती आहे. त्याच्या शिस्तबद्ध रांगेमध्ये ऐक्य आहे. नमाज म्हणजे केवळ इस्लामिक जीवन नसून शिस्त आहे. अल्लाहबरोबर आध्यात्मिक संपर्क हा मूळ हेतू असला तरी दैनंदिन जीवनात आपली वर्तणूक कशी असावी याची प्रार्थनेमध्ये शिकवणदेखील आहे. नमाज प्रार्थनेचा रूढ प्रकार असला तरी त्यात नम्रतेचा आणि अल्लाहच्या श्रद्धेचा आविष्कार आहे. 'अल्लाहूअकबर' तो सर्वश्रेष्ठ आहे हे शब्द प्रार्थनेत पुन:पुन्हा उच्चारण्यात येतात. अल्लाहच्या महानतेची ती पोचपावती आहे.

## उपवास (सौम)

उपवास (सौम) हा इस्लामचा तिसरा स्तंभ आहे. पहाटेपासून संध्याकाळपर्यंत उपवासधारक काहीही खात नाही अथवा पाण्याचा थेंबदेखील घेत नाही. अशाप्रकारे शिस्तबद्ध होऊन तो स्वत: जीवनाच्या महत्वाच्या गरजांना हिरावतो. यातून सहनशक्तीची मौल्यवान शिकवण त्याला मिळते. अन्न नाही, पाणी नाही. यामुळे स्वभावत: तो भुकेला होतो, त्याला तहान लागते. त्याची शक्ती कमी होऊ लागते. त्याचे मन:स्वास्थ बिघडते. दैनंदिन जीवनावर त्याचा परिणाम होतो. परंतु अत्युच्च स्तरावरील शिस्तीच्या भावनेमुळे या सर्व अडचणी आणि अस्वस्थतेवर तो मात करतो. दक्षता बाळगतो. मन खचू देत नाही. दृढतेने तो आपले कर्तव्य बजावत असतो. चांगले खाद्यान्न आणि पेयजल त्याच्या पुढ्यात ठेवले तरी दोन्हींची उत्कट इच्छा असतानादेखील त्याला तो स्पर्श करत नाही. अशा प्रकारे तो

नियमबद्ध आणि जबाबदार जीवनशैलीसाठी तयारी करतो. केवळ आपले कर्तव्य करतो आणि अपायकारक कृत्यांपासून आणि सवयींपासून दूर राहातो. संकटांना झुगारून त्याच्या जीवनाचे कार्यक्षेत्र तो बळकट करीत असतो.

अल्लाहने माणसास अगणित देणग्या बहाल केल्या आहेत. मात्र त्याबद्दल त्याच्या मनात कृतज्ञतेची भावना नसते. हवा, सूर्य, पाणी यासारख्या हितकारक सामग्रींचा त्याच्यावर वर्षाव होत असतो. यापैकी कोणत्याही एका गोष्टीच्या अभावामुळे त्याचे संतुलित जीवन बिघडते. स्वत: काही कष्ट न करता ही सर्व साम्रगी त्याला प्राप्त झाल्यामुळे त्यांना तो महत्व देत नाही आणि त्याच्यापर्यंत त्या कोणत्या माध्यमातून आल्या यावर कधी विचार करत नाही.

अल्पकाळासाठी उपवासामुळे त्याच्या ज्या इच्छा आहेत त्यांना प्रतिबंध होतो आणि अल्लाहकडून प्राप्त झालेल्या देणग्यांची त्याला जाणीव होते. सूर्यास्ताच्या वेळी संपूर्ण दिवसभराची भूक आणि तहान यामुळे जो अस्वस्थ होतो, त्याला थकवा आलेला असतो. अशावेळी तो उपहार करतो, पेयजल घेतो. अल्लाहच्या औदार्यावर तो किती अवलंबून आहे याची जाणीव त्याला होते. तो कृतज्ञतेच्या भावनेने भाराऊन जातो. श्रद्धावंतांसाठी या जगातील जीवन म्हणजे संयम आणि सहनशीलता! अल्लाहने त्याच्यासाठी काही योग्य ठरवले आहे आणि काही अयोग्य ठरवले आहे. त्यामुळे त्याच्या उपभोगावर मर्यादा आहेत. सदाचरण आणि सत्याच्या मार्गात अनेक अडथळे आहेत. श्रद्धावंत खंबीरपणे त्याचा मुकाबला करतो. यासाठी सहनशक्तीची गरज आहे. यखेरीज इस्लामच्या मार्गाने कोणीही वाटचाल करू शकत नाही. वर्षभरात एक महिना उपवास यामुळे चारित्र्याची जडणघडण होते. उपवासाच्या महिन्यानंतर श्रद्धावंतास वर्षभर सदाचाराच्या मार्गाने जावयाचे असते. असहिष्णुता, निष्ठुरता आणि सर्व प्रकारच्या वाईट कृत्यांना टाळावे लागते. अल्लाहच्या आज्ञांमध्ये ढवळाढवळ करण्याचा तो प्रयत्न करीत नाही. उपवास म्हणजे निर्धारित वेळेसाठी अन्न आणि पाणी न घेणे. असे त्याचे स्वरूप असले तरी प्रामुख्याने सुखत्याग, संयम, सहनशीलता, मनोधैर्य यासारखे सद्‌गुण विकसित करणे हाच हेतू आहे.

# दानधर्म (जकात)

जकात इस्लामचा चौथा स्तंभ. दरवर्षी स्वत: केलेल्या बचतीचा आणि संपत्तीचा काही भाग सामान्यपणे २.५ टक्के अल्लाहसाठी राखून ठेवणे आणि तो धार्मिक कर्तव्यांच्या पूर्ततेसाठी, गरिबांसाठी आणि गरजवंतांसाठी खर्च करणे म्हणजे जकात. तुमच्याजवळ जे काही आहे ते अल्लाहचेच आहे. अल्लाहकडून ऐहिक जीवनातील कृपा मागे घेण्यात आल्या तर कोणासही एखादा कारखाना अथवा उद्योग सुरू करता येणार नाही. सर्व योजना कोलमडून पडतील आणि प्रयत्न निष्फळ होतील.

जकात म्हणजे पैशाच्या विनियोगातून या वास्तव्यास व्यावहारिक मान्यता देणे. इस्लामच्या तत्त्वप्रणालीप्रमाणे वैयक्तिक संपत्ती अल्लाहची आहे हे माणसाने लक्षात घ्यावे आणि त्यातील काही भाग अल्लाहसाठी राखून ठेवावा. कोणतीही कमाल मर्यादा निर्धारित करण्यात आलेली नाही. जकातच्या कायद्यानुसार प्रत्येक व्यक्तीने त्याची अंमलबजावणी करावयाची आहे. प्रत्येकाने त्याची संपत्ती अथवा मालमत्तेची निर्धारित किमान मर्यादा दरवर्षी अल्लाहने दिलेल्या नियमावलीप्रमाणे खर्च करावी. अशाप्रकारे आपल्या संपत्तीतून दानधर्म केल्यास त्याने ती स्वीकारणाऱ्यास कमी लेखू नये. त्याचप्रमाणे त्याच्या मनात उपकाराची भावना नसावी. आपली संपत्ती ही अल्लाहची अनामत आहे असे समजून त्याने योग्य हक्कदार, गरजवंतांना दानधर्म करावा. दुसऱ्यांना त्याने भोजन द्यावे. त्यालाही मृत्युपश्चात जीवनात भोजन प्राप्त होईल. त्याने दुसऱ्यास द्यावे म्हणजे मृत्युपश्चात जगात त्याला अल्लाहचे सहाय्य नाकारण्यात येणार नाही.

दुसऱ्यांचा हक्क व त्यांचे दु:ख व यातना याबद्दल सहानुभूतीची जाणीव असणे दानधर्माचे प्रतीक आहे. या भावना खोल रुजलेल्या असाव्यात, आणि स्वत:ची साधन-संपत्ती दुसऱ्याची आहे अशी धारणा असावी. या व्यतिरिक्त दुसऱ्यास सेवा देताना त्याबद्दल काही अपेक्षा नसावी. दुसऱ्यांपासून काही प्राप्त होईल किंवा त्याबद्दल काही मोबदला मिळेल अशी अपेक्षा न बाळगता प्रत्येकाने दुसऱ्याची प्रतिष्ठा जाणावी. तो केवळ मित्र आणि नातेवाईकांसाठी सदिच्छा बाळगणारा नसावा. समाजातील सर्व धर्मांच्या लोकांसाठी समान

भावना असावी. सर्व प्रथम जकात म्हणजे अल्लाहने दिलेली मालमत्ता आहे. संपूर्ण आयुष्यभर इतरांसाठी मालमत्तेतील काही भाग ठेवण्यात यावा.

दुसऱ्याच्या सेवेबद्दल व्यावहारिक मिळकतीची अपेक्षा करणे हे सामाजिकदृष्ट्या चुकीचे आहे. अशा प्रकारची वर्तणूक म्हणजे पैसे परत व्याजासहित मिळावेत अशी अपेक्षा! ही सामान्य बाब आहे. त्यामुळे लुटण्याची प्रवृत्ती बोकाळते व दुसऱ्यांना लुटण्याची वृत्ती वाढते. परिणामत: समाज विस्कळित होतो.

श्रीमंत असो वा गरीब अशा विस्कळित सामाजात कोणीही सुखी असणार नाही. जर माणूस खऱ्या अर्थाने प्रवृत्त झाला तर अल्लाहकडून आपणास मोबदला मिळेल या अपेक्षेने तो इतर लोकांची सेवा करतो. मृत्युपश्चात जगात आपणास पूर्ण मोबदला मिळेल या भावनेने तो दुसऱ्यांना देत असतो. ज्या समाजामध्ये स्वार्थ आहे एकमेकाबद्दल द्वेष भावना आहे तो समाज केव्हाही विकसित होऊ शकत नाही.

जकात अर्थात दानधर्म हा वार्षिक कर आहे. तो देणे प्रत्येकाचे कर्तव्य आहे.

## हजयात्रा

हजयात्रा हा इस्लामचा पाचवा स्तंभ आहे. या प्रसंगी मक्का येथे सर्व लोक एकत्र येऊन प्रथापरंपरेप्रमाणे अल्लाहची प्रार्थना करतात. इस्लामिक प्रार्थनेचे हजमध्ये  अधिक भव्य पद्धतीने प्रकटीकरण करण्यात येते. न शिवलेले कापड (एहराम) परिधान करणे हे हजमध्ये फार मोठे कर्तव्य समजतात. अशा प्रकारे वस्त्र परिधान केल्यामुळे सर्व देशातील लोक एकसमान दिसतात. त्यांच्या साधेपणामुळे दुसऱ्याहून आपण मोठे आहोत अशी भावना कोणातही राहात नाही.

इस्लाम धर्मानुसार मानवाचे जीवन अल्लाहभोवती फिरत राहावयास हवे. काबा भोवती प्रदक्षिणा घालणे हा त्याचाच एक प्रकार आहे. सफा आणि मरवा या दोन टेकड्यांमध्ये धावणे म्हणजे अल्लाहच्या आज्ञेचे पालन करणे या उत्कट भावनेचा उद्रेक आहे. “लबैक अल्लाहुम्मा लबैक” ‘मी हजर आहे, हे

अल्लाह! मी हजर आहे!' हे पुन्हा पुन्हा उद्‌गारले जाणारे शब्द अल्लाहसमोर नतमस्तक होण्याची इच्छा प्रकट करतात.

अराफातच्या विशाल मैदानावरील जमावाचे ते विलोभनीय दृष्य, त्यादिवशी अल्लाहसमोर सर्व लोकांना अशाचप्रकारे एकत्रित करण्यात येईल याची जाणीव करून देते. सैतानाबद्दल माणसाची असहिष्णुता याबाबतीत इस्लाम ठाम आहे. सैतानाच्या सांकेतिक प्रतिकृतीवर दगडाचा मारा करणे हे पाप करण्यापासून परावृत्त होण्याचे प्रत्यक्षिक आहे. अल्लाहशी केलेला करार इस्लाममध्ये सर्वाधिक श्रेष्ठ आहे. कदाचित जीवन आणि मालमत्ता याहूनही अधिक! मीना येथे करण्यात येणारी प्राण्यांची कुरबानी हे त्याचे व्यावहारिक मूळ स्वरुप आहे.

सामाजिक एकतेस इस्लाम धर्मात नेहमीच खूप मोलाचे स्थान आहे आणि म्हणून इतरांचा द्वेष न करणे याचे माणसाजवळ सामर्थ्य असणे यास महत्व देण्यात आले आहे, जेणे करून सर्व प्रकारची भिन्नता नष्ट व्हावी. अशा प्रकारच्या शिस्तबद्धतेसाठी हज यात्रेनिमित्त एकत्रित येणारा प्रचंड जनसमुदाय म्हणजे एक खास प्रसंग आहे. हजच्या कालावधीमध्ये गार्‍हाणे, राग, वायफळ गप्पा, लढाई, सजीवांना इजा पोहोचवणे, बीभत्सपणा अथवा अप्रामाणिकपणा यास स्थान नाही. तसा आदेश आहे. अल्लाहच्या निष्ठावंताने त्याला अल्लाहची कृपा हवी असेल, तर एकदुसर्‍याशी आदरभावाने आणि चांगुलपणाने वागावे.

हजयात्रा अल्लाहभिमुख जीवनशैलीची एक शिकवण आहे. त्यावेळी हज करणार्‍यास कयामतच्या भयानक दिवसाची आठवण होते. तो दिवस अनेकांसाठी दु:खदायी असू शकतो. अल्लाहच्या प्राप्तीचा तो प्रारंभ आहे. सर्व सामर्थ्यनिशी सदाचाराच्या मार्गाकडे ती वाटचाल आहे. सैतान हा आपला धूर्त वैरी आहे. त्याला आपल्या जवळ येऊ देऊ नये याची सूचना आहे. जर अल्लाहच्या औदार्याची अपेक्षा असेल तर त्याच्यासाठी आपला जीव आणि मालमत्ता समर्पित करण्याची आपली तयारी असणे आवश्यक आहे. हज म्हणजे मानवी समानतेचे उत्कट प्रदर्शन आहे. त्यात इतरेजनांची नापसंत वर्तणूक सहन करण्याची क्षमता आहे. त्याचप्रमाणे एकता, परस्पर सदिच्छा

आणि स्नेहभाव यास त्यामध्ये सर्वाधिक महत्व आहे.

तात्पर्य हजयात्रा ही परिपूर्ण पद्धत आहे. मात्र ती योग्य प्रकारे अमलात आणणे आवश्यक आहे. त्यामुळे धार्मिक अथवा व्यावहारिक माणसाच्या नैतिकतेवर त्याचा परिणाम होतो.

## इस्लाम आणि आध्यात्मवाद

कुरआननुसार अध्यात्म प्रत्येक व्यक्तीच्या हृदयात असते. मात्र केवळ बौद्धिकतेच्या स्तरावरच ते प्राप्त होते. वेगवेगळ्या शब्दप्रयोगाद्वारे कुरआनमध्ये त्याचा उल्लेख आहे. तवस्सुम, तद्ब्बुर आणि तफ्क्कुर याचा अर्थ विचार, मनन, आणि चिंतन या माध्यमातून शिकवण प्राप्त करणे.

आपल्या सभोवतालच्या सर्व वस्तू-गवतापासून विशाल आकाशगंगेपर्यंत, वृक्ष आणि वनस्पतीपासून पर्वतांपासून, सूर्यापर्यंत, चंद्र आणि आकाशापर्यंत सर्व निर्मात्याची अबोल आठवण करून देतात. या ग्रहावर अथवा सृष्टीत जे काही अप्रतीम आहे ते महान निर्मात्याची भव्यता दर्शवितात.

अध्यात्म मानवी मनाचे उदात्तीकरण आहे. इस्लाममध्ये अध्यात्म एक बौद्धिक कृती आहे. त्याच्या उद्योगामध्ये दुहेरी कृतींचा समावेश आहे. एक मी कोण आहे? या प्रश्नावर गांभिर्याने विचार करणे. माझ्या सभोवतालचे जग काय आहे? मानवासाठी त्याचप्रमाणे जगातील इतर गोष्टींसाठी अल्लाहची निर्मिती योजना काय आहे? दुसरी बाब आहे पुरुष आणि स्त्री यांचा या जगात नकारार्थी अनुभव काय आहे? आणि त्याची सकारात्मक उकल काय आहे?

मन आणि आत्मा यामधील आंतरिक परिवर्तन याचे आध्यात्मिकतेत रूपांतर होते. ज्यामध्ये शांती आणि प्रसन्नता आहे. ज्याच्यामध्ये आंतरिक आध्यात्मिकता आहे ती बहिस्थ आध्यात्मिकतेत प्रतिबिंबित होते. अशा प्रकारची व्यक्ती अधिक समाधानी, सहिष्णुतावादी आणि इतरांसाठी आदरणीय बनते. राग, द्वेष आणि नकारात्मक भूमिका यांचे सकारात्मक भूमिकेत रूपांतर होते आणि त्यामुळे क्षमा आणि द्येची भावना निर्माण होते.

स्वत:ची मत:प्रणाली दुसऱ्यावर लादण्याऐवजी तो अधिक समंजस बनतो, तो कमी बोलतो आणि अधिक ऐकतो. दुसऱ्यांच्या चुका दाखवण्यापेक्षा तो आत्मपरीक्षण करण्यासाठी आणला वेळ देतो. आपल्या हक्कांपेक्षा कर्तव्याकडेच त्याचे अधिक लक्ष असते. निरुपद्रवी व्यक्ति म्हणून तो जगत असतो आणि समाजास अर्थपूर्ण आणि सकारात्मक मार्गांनी हातभार लावतो.

आणि म्हणून निर्मात्याची ओळख आणि आध्यात्मिक स्तरावर स्वत:ची उन्नती करणे आणि अल्लाहच्या निर्मिती योजनेनुसार जीवन व्यतीत करणे ही प्रत्येकाची जबाबदारी आहे. मृत्युपश्चात जीवनाचा विसर पडल्यामुळे आणि ऐहिक जीवनाचा पाठपुरावा यामुळे ते असे करत नाहीत हे प्रमुख कारण आहे. त्यानंतर मनुष्याचे जीवन अल्लाहच्या स्मरणात व्यतीत होते. अल्लाहच्या अस्तित्वाची त्याला जाणिव होते. प्रत्येक गोष्ट त्याला अल्लाहची आठवण करून देत असते. अल्लाहचे स्मरण त्याच्या मनातून, हृदयातून जात नाही. त्याची सकाळ, त्याची संध्याकाळ अल्लाहच्या सानिध्यात जाते. पावसाने पीक उजळून निघते. त्याप्रमाणे त्याचे मनदेखील अल्लाहच्या स्मरणांत एकरूप होते.

नुकसान झाल्यास त्याचे फायद्यात रूपांतर होते आणि संकटे शुभवार्ता घेऊन येतात अशी इस्लाममध्ये अल्लाहबद्दल संकल्पना आहे. अल्लाहस पूर्ण समर्पित होणे आणि अल्लाहभिमुख जीवन जगणे यामुळे माणसाचे पूर्ण समाधान होते. त्याच्या जीवनाचा हेतू सफल होतो. ज्यावेळी अल्लाहचा शोध लागल्यानंतर तो त्याची प्रार्थना करतो, त्याचे स्मरण करतो त्यावेळी त्याचे मन पूर्ण एकाग्रतेने त्याच्याकडे आकर्षित होते. ज्यावेळी तो विनंती अथवा याचना करतो त्यावेळी निर्मात्याशी तो संपर्क साधतो. अशा क्षणी तो आपल्या पालनकर्त्याशी मृदू शब्दांत संभाषण करतो. आपण आपले मन मोकळे करीत आहोत आणि तो त्याच्या याचनेस प्रतिसाद देत आहे अशी त्याची भावना होते.

अल्लाहभिमुख जीवनाचा हा प्रारंभ आहे. त्याचप्रमाणे परिपूर्ण व्यक्तिमत्वाचा त्यात विकास आहे. अल्लाहशी समर्पित होण्यामध्येच माणसास आणि संपूर्ण सृष्टीस त्याच्या ध्येयाची ओळख होते. माणसाने स्वत:हून कोणत्याही जबरदस्तीखेरीज अल्लाहस समर्पित व्हावे. हीच त्याची कसोटी आहे. त्यामुळे त्याच्या व्यक्तीमत्वाचा विकास होतो आणि त्याच्या आत्म्याचे शुद्धिकरण होते. अशा प्रकारच्या व्यक्ती स्वर्गात वास्तव्य करतील आणि

सर्वाधिक दयाळू अल्लाह म्हणू लागेल :

**हे शांत आत्म्या!**
**परत ये पालनकर्त्याकडे,**
**प्रसन्नतेने, प्रसन्न करीत**
**सामील हो माझ्या सेवकात,**
**प्रवेश कर माझ्या स्वर्गात!**



## Towards Spiritual Living

Al-Risala and Spirit of islam are two monthly spiritual magazines. They aim at helping indivuduals discover for themselves answers to their questions on spirituality, religion, this life and life beyond, and also instill in them the spirit of dawah work.




## Annual Subscription

Al-Risala : India - ₹200 Overseas - US $ 20

Spirit of Islam : India - ₹400 Overseas - US $30


**Al-Risala**
1, Nizamuddin West Market, New Delhi - 110013
Tel.: 011-41827083 / 46521511 / Mob.: +91-8588822679 / +91-8588822680

**Spirit of Islam**
002, HM Wimberly, 6, Barlie Street Cross, Langford Town, Bangalore - 560025
**Mob.:** +91-8050202626 / **Email :** subscription @thespiritofislam.org
**Web :** www.spiritofislam.co.in


---

ही पुस्तिका खालील पत्त्यावर मिळेल.


**अब्दुस समद खलिल अहेमद**

**१०५०, रविवार पेठ, पुणे - ४११००२**

**फोन नं. : 020 24472830 मोबा. नं.: 9665059035**

# THE QURAN

A book which brings glad tidings to mankind along with divine admonition, stresses the importance of man's discovery of truth on both spiritual and intellectual planes. The main themes of the Quran are enlightenment, closeness to God, peace and spirituality. The objective of the Quran is to make man aware of the Creation Plan of God.

## Available in different languages
## Easy to understand





































Buy Online / Order Free Quran / Download / Be a Quran Distributor

www.goodwordbooks.com / www.j.mp/freequran4all